# प्रास्ताविक निवेदन

'नवें नवनीत' तयार करतांना अनेक प्राचीन मराठी हस्तलिखितें पाहण्याचा योग आला, व त्यापैकीं पुष्कळांच्या नकला मिळवून ठेवल्या. तथापि त्यांचें प्रकाशन करण्यासाठीं जरुर तें काम करण्यास वेळ मिळेना व अशा ग्रंथांचें रार्चाचें प्रकाशन कसें करावें हाहि प्रश्न उभा राहिल्यामुळें मध्यंतरीं दोन वर्षे गेलीं. कांहीं विद्वान्, विद्यापीठ, साहित्याच्या वर्धनार्थ निर्माण झालेल्या संस्था यांच्याशीं याबद्दल पत्रव्यवहार करुन पाहिला. कांहींनीं उत्तरेंच दिलीं नाहींत आलेल्या उत्तरांतून कांहीं निष्पन्न होणार नाहीं हें दिसून आलें. एका मंडळाच्या जाहीर पत्रकानुसार जमवीत असलेल्या हस्तलिखितांची यादी मंडळास पाठविली. मंडळ काय मदत करील असें विचारलें तेव्हां 'अर्जातली' विनंती मान्य नसल्याचें मंडळाच्या चिटणीसांनीं कळविलें. चौभाच्या उपाहरणाचीं पृष्ठें एका भारदस्त गणलेल्या मासिकाकडे प्रकाशनार्थ पाठविलीं होतीं. तीं छापूं असें मासिकाच्या संपादकांनीं प्रथम उत्तर पाठविलें, परंतु बऱ्याच काळानंतर तीं छापणें कठीण असल्याचें पत्र आलें. आधुनिक काळातली प्राचीन वाङ्मयाबद्दलची खरी परिस्थिति अशी आहे.

प्राचीन मराठी ग्रंथांना वाचकहि थोडे. त्यामुळें असे ग्रंथ खपण्याला दीर्घकाळ लागतो. ग्रंथाच्या हजार प्रती छापाव्या का नाहीं याचा विचार करण्याची पाळी येते. अशीं प्रकाशनें वैयक्तिकरीत्या करतांना प्रथमपासून शेवटपर्यंत नाना तऱ्हेच्या अडचणी येतात. तथापि आपल्याला शक्य तेवढें करावें या उद्देशानें कांहीं लहान हस्तलिखिताचें प्रकाशन करण्याचा हा उपक्रम सुरु केला आहे, व पुढें आणखी खंड प्रकाशित करणें शक्य होईल अशी आशा करतो

धुळ्याच्या राजवाडे संशोधनमंदिराचे श्री. द. रा. भट, तेथील श्रीसमर्थ वाग्देवता मंदिराचे चिटणीस श्री. न. वि शिदोरे व तंजावर येथील सरस्वतीमहाल वाचनालयाचे चालक व कर्मचारी यांनीं तत्परतेनें जरुर ते सर्व साहाय्य केलें. लोकसत्तेचे संपादक श्री. ह रा. महाजनी, व महाराष्ट्र साहित्यपत्रिकेचे संपादक प्रा. दि. के बेडेकर यांनीं तत्परतेनें प्रस्तुत वाङ्मयावरील लेख छापले या सर्वांचा फार आभारी आहे. एक उल्लेखनीय गोष्ट अशी कीं हिशेबखात्याच्या रुक्ष वातावरणांत देखील वाङ्मयाबद्दल आस्था खालच्या थरांत तरी अजून शिल्लक राहिलेली आढळते व या कचेरीतले माझे एक सहकारी श्री. य. वि जोशी आणि त्यांचे मदतनीस यांनीं परिश्रम घेऊन उपाहरणाच्या पृष्ठांची स्थूल कल्पना करुन दिली. याबद्दल त्यांचे सर्वांचे आभार मानतो. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयानें प्रकाशनाचा अन्य सर्व व्याप आपल्याकडे घेतला व या संस्थेचे प्रमुख कार्यवाह श्री. वा. वि. भट यांनीं आपला वेळ खर्च करुन सर्व प्रकारें मदत केली, याबद्दल संस्थेचे कर्मचारी व प्रमुख कार्यवाह यांचा मी अत्यंत आभारी आहे.

अशा तऱ्हेच्या कामांत पुष्कळांची मदत घ्यावी लागते व प्रत्येकाचा नामनिर्देश करणें कठीण तसेंच अशा ग्रंथांत चुका राहतातच तरी त्याबद्दल सर्वांनीं क्षमा करावी ही विनंती.

रुक्मिणी निवास
पहिली गल्ली, हिंदु कॉलनी
दादर—मुंबई १४
१९-१०-१९६१

ज. शा. देशपांडे

## —: अनुक्रमणिका :—



## शुद्धिपत्र

| पृष्ठ | श्लोक अथवा ओवी | छापील मजकूर | शुद्ध मजकूर |
|---|---|---|---|
| २ | २३ | ममे | गमे |
| ७ | ९० | खाय | साय |
| २६ | ७३ | वहुतत्रीव | वहुतवीध |
| ,, | ९४ | आस | आसे |
| ३१ | १५ | तपीसी | तपीसीं |
| ,, | २२ | झुंजतातु पुरीतीच | झुंजता तुपुरीतीच |

विठ्ठल कळ्पूरकरकृत

# रासक्रीडा

(लेखनकाल इ. स. १६१४)

श्रीगणेशाय नम ॥

जय जय गणनाथा हस्त टेऊनि माथा ।
भडकरि कवियूथा दाखरी ज्ञानपथा ॥
मुनिवर परमार्था सिद्धि धावी समर्था ।
रसिकपदपदार्था देइजे याचि अर्था ॥ १ ॥

जनक तू जननी द्विरदानना । तुजविना दुसन्यास भजेचि ना ॥
हरिकथा वदता कविविठ्ठला । करि कृपा शरणागतवत्सला ॥ २

करस्पर्शे होता अहता जळाली । अकारादि बीजे सकारादि जाली ॥
मना वामनाचें पदाब्जीं रमावें । अभिप्राय होऊनि सौरस्य घ्यावें ॥ ३

कृपाळ बुद्धी मजलागि द्यावें । न्यूनत्व अथार्थरम्यीं नमावें ॥
वर्णीन राधा हरि आदरेसीं । मनोपती सर्व गुणप्रराशी ॥ ४

उत्कारता (?) सांगतो पूर्णभावें । जेथे येती कृष्ण गोपाळ नांवें ॥
तेणें वाणी पुण्य होईल कीनी । मोठी पावें दिग्गजाआड जानी ॥ ५

वसतकाळीं तिथि पौर्णिमेसी । सांगे सखी जाउनि राधिकेसी ॥
सफल गे हा हरि येतु आता । चंद्रानने सत्वर जाइजेना ॥ ६

यमुनातट निर्मळ वाहतसे । नलिनी कुमुदी बहु शोभतसे ॥
क्षण बैसुनि कुञ्जगृहीं सुरसे । यदुवंशविभूषण प्रभु असे ॥ ७

त्वरित घेउनि सर्वहि भूषणें । त्यजुनिया जडित निज सहुणे ॥
वचन आयकता मृगलोचना । मृदु वदे सखि जाइन त्या वना ॥ ८

अथ परिमळतैलें शीघ्र अभ्यांग केला।
पुसुनि कुटिल सोडी मोकळे केश बाला ॥
तिलक शुभ कलाटीं बिंदु कस्तुरिचे(चा)।
... ... ... ॥ ९

[ श्लोक १०, ११, १२ व १३ नाहींत ]

... ... ... ।
... बांगड्या योजिताहे ॥
कनकरचित भार्षी ती पुढें येकि काळी।
चकित हरिणनेत्रा हस्तसंलग्न त्याली ॥ १४

कटितटीं नवहाटककिंकिणी। रणझुणी अतिमंजुल तो ध्वनी ॥
धरुनि कज्जलपूर्ण सळेगरी। नयन चंचल लेखित सुंदरी ॥ १५

आंगुळीस नवरत्नमुद्रिका। घातल्या परमदीप्तिकारका ॥
फाकती किरण कंकणावरीं। शोभती कर नखें परोपरी ॥ १६

सुवर्णावरी जोडिली रत्नपंक्ती। तळीं थोर वर्तूळ तेजिष्ट मोती ॥
कसे नासिकीं वोष्ट सन्नीध आले। क्षणी तेचि आरक्त होऊनि ठेले ॥ १७
पदीं नूपुरे शुद्ध जांबूनदाची। वरी लेइली भूषणें आंगुळीची ॥
रसाधीश राधा करी या प्रकारें। असें व्यापिलें कामबाणप्रहारें ॥ १८
चंदनकेशरमिश्रित आली। कापुर घालुनि शुद्ध उगाळी ॥
घेउनि ऊटी धरि मग बाला। घालित सुंदर चंपकमाला ॥ १९
विमल तांबुल सत्वर आणिलें। कदलिसंभवमिश्रित घेतलें ॥
मुकुर वामकरांगुलिनें धरी। निजरुपास विलोकित सुंदरी ॥ २०
सबुद्धिनें राधा मतें वर्णवेना। तिचा पार ये वैखरीतें कळेना ॥
जिसी कृष्ण तो थोर आसक्त आहे। विरंची जयाचा रसे पाक पाहे ॥ २१
अथानंतरें कुंजगेहासि राधा। कशी चालली हंसचाली अगाधा ॥
वसंतीं वनीं फूलले सर्व वृक्ष। शशीहेमवन्हिद्युतीचे विपक्ष ॥ २२
अरुणकोमलपल्लवसंयुता। क्षितिरुहावरी जाति महालता ॥
मज मनें मदनाग्निशिखा किती। पथिकचित्त वनासहि जाळिती ॥ २३
बहुल पुष्पपराग महीवरी। मलयमारुत टाकित कूसरी ॥
मधुवनी विरहानल चालती। सुरमणी रमणी स्मरती किती ॥ २४
कुसुमभार वरी बहु दाटले। अतिविनम्र धरारुह शोभले ॥
बहुगुणी वदनी मज वर्णिले। तमतळीं शरणागत रक्षिले ॥ २५

दुरजनी रजनी सहकामिनी । करमिजे रमिजे सगुणी जनी ॥
कुहरिणी हरिणी हरिणा नवे । विचरती चरती अतिलाघवे ॥ २६

ऐसा वसंततिलकामवने चरीसी ।
नेदी करूं परम चंचलता मनासी ॥
घेऊनि मुग्धकुसुमाभरणा किराती ।
टाकूनि मान पुरुषाप्रति शीघ्र जाती ॥ २७

ऐसा समारंभ वसंतराजा । दावीतसे सर्व जनासि वोजा ॥
देखोनि राधा मग पंचबाणें । जे पीडिली ते विधिही न जाणे ॥ २८

वसंत नोव्हे तरि गारुडी हा । लाऊनिया कामभुजंग देहा ॥
करीतसे विव्हळ राधिकेतें । तें चिंतिताहे गरुडध्वजातें ॥ २९

धरुनिया हृदयीं पुरुषोत्तमा । त्वरित जात असे अति उत्तमा ॥
स्तननितंबभरें बहु दाटली । परि मनी न मनीतहि चालली ॥ ३०

ऐसी राधा स्थलकमळिनी पुष्पगंधा भ्रिरंगा ।
पूढें देखे दिनमणिसुता जे महापुण्यगंगा ॥
तीचे तोये अणुभरि वपु स्पर्शता पंचपापी ।
वैकुंठीं ते त्वरित वसती पुण्यतोय प्रतापी ॥ ३१

वेणी जशी परम सुंदरता तयेची । ऐसी विशालनयना क्षितिलोचनाची ॥
ते फेणबिंदु कुसुमे शुभ्रमाल्तीची । देखोनिया स्थिर मनोगति राधिकेची ॥ ३२

नमस्कार ती ते करी शीघ्र थाला । म्हणे माय तूं तारिसी भूमिगोला ॥
जलप्राशने मज्जने ब्रह्महत्या- । दिके पातकें नासती कोण नीत्या ॥ ३३

मिळाल्या समस्ता नदीसागरातें । तरी श्लाघ्यता तो न पावेचि मातें ॥
तुझ्याची जले पुण्य होऊनि गंगा । मिळाली(च) तैं धन्य मानी निजांगा ॥ ३४

जलस्वरूपें तरि आदिशक्ती । भूमीवरी आलिस थोर युक्ती ॥
जे उद्धारा ने जड जंतु मातें । वांछीत देसी निज मागत्यातें ॥ ३५

असो हे निकुंजाप्रती खजनाक्षी । वरी चालिली मध्यभागीं निरीक्षी ॥
मना रम्य ते स्थान दामोदराचें । कळे ना सुरां कारण गुह्य त्याचें ॥ ३६

वृक्ष आणि लता परस्परें । होऊनि निबिड पुष्पिता भरें ॥
अंतरिक्ष मनोहर राहे । तें निकुंजगृह बोलति पाहे ॥ ३७

मदमद वदेति कोकिळ सारसे बहुधा रसें ।
सारिका शुक मोर चातक थोर शब्द मदालसे ॥
चंचरीक करिती गुंजति मातले मधुमासवे ।
हेमपद्मसरोवरि मृदु हंस बोलति वैभवें ॥ ३८

देवाप या वाहत अग्रभागीं । स्वेच्छे जळें हारित पाप वेगीं ॥
विचित्र मार्गे उसळेति कैशा । जावाति भेटी तरणीस जैशा ॥ ३९
कैसे मनोरम्य मनोहरातें । कैसे महासीतळ सीतळातें ॥
कैसे सुगंधीत सुगंध भारी । प्रह्लादसे कुंजगृहास नारी ॥ ४०

अभिनव रसवृत्ती तेथिंची कोण जाणे ।
सहजचि नलिनाक्षी व्यापिली पंचबाणें ॥
अधिक विरहतापें तापली होत बाधा ।
स्मरत नरहरीतें अंतरीं जाय राधा ॥ ४१

घेऊनिया कोमल पल्लवासी । शय्या करूनी प्रमदा स्वरेसी ॥
बैसोनि तेथें मधुसूदनाचा । ते मार्ग पाहे मनकायवाचा ॥ ४२
करूनी मनाकारणें स्वस्थ रामा । विलंबे बहू पाहिला कृष्णधर्मा ॥
न देखेचि येतां तये थोर चिंता । म्हणे कां न ये आझुनी दैत्यहंता ॥ ४३
मनीं धीर नोव्हेचि बाहेर बाला । उभी राहिली हस्त लाऊनि भाळा ॥
विलोकी महाआदरें कृष्णनाथा । म्हणे पाव दामोदरा देवनाथा ॥ ४४
वेळोवेळां आंत बाहेर आली । श्वासोच्छ्वासा टाकिते मागुताली ॥
उठे बैसे स्तब्ध होऊनि राहे । कांहीं वाजे तेधवां वास पाहे ॥ ४५

मृगचरण निघाते लागती शुष्कपत्रा ।
झडकरि उभी राहे कर्णपर्यंत नेत्रा ॥
निजकरकमळाते आचळातें धरीतें ।
धरुनि पुनरपीही शंकिते मस्तकातें ॥ ४६

करी तर्क नाना परी भ्रांत चित्त । म्हणे काय येऊनि गेला अनंत ॥
क्षणीं गुंतला आणिके नाइकेसी । अळवें न ये मी करूं काय कैसी ॥ ४७

येखादा असुरेंद्र या जरि वनामध्यें उदेला असे ।
त्यासी युद्ध करावया जरि हरी राहे करावें कसें ॥
आरंभीहुनि हे कुलक्षण... ज्याकारणें लागलें ॥
कैसे वैर करूनि आजि विरहावर्तीमध्यें घातलें ॥ ४८

विधीचे जई वेद शंखासुर नेले । तई याचिये गांठिचें काय गेलें ॥
बळे मच्छ होऊनिया पापबुद्धी । वधील तया गुंतला काय युद्धीं ? ॥ ४९
जई हे धरा जात होती तळासी । तई काय सोळब होता दळासी ॥
बळें कूर्म होऊनिया भार वाहे । तसा मागुती गुंतला काय आहे ॥ ५०

असुर कनकनामें नेत होता धरित्री ।
शिव विधि अमरेश रूप देखोनि नेत्रीं ।

तद्द कुटिलपणें हो रूप घे शूकराचें ।
पुनरपि आणि तैसें राहणें होय त्याचें ॥ ५१

ज्याचें नामी ( अ ) धें हेमस्वभाव । तो पुत्रातें शोकची नीतिभाव ॥
घाया खंडी स्तंभ मोडोनि कैसा । मारी त्यातें गुंतला काय तैसा ॥ ५२

दानशील नृप तो महाबळी । यागकर्म करितां कुमंडळीं ॥
त्यासि घालुनि धरातळी बसे । द्वार राखत क्षणी तसा असे ॥ ५३

क्षेत्रीं पृथ्वी भोगितां नीतिभावें । घायां जाला जामदग्नी अभावें ॥
भूदद्संख्या वेळ संहार केला । तैसा कोठें लीन होऊनि ठेला ॥ ५४

दशमुख निजलक्ष्मी भोगितां काय केलें ।
दशरथसुत जाला थूड अद्भुत केलें ॥
पुकटच कुटिळाणें संहरीलें तयातें ।
पुनरपि क्षणि कोठें गोविलें आपणातें ॥ ५५

असि तर्क करित असे भुवनी । हरिवाचुनि शून्य दिसे अवनी ॥
शफरि जळसंघरहित जसि । विरहानल धाढत थोरगती ॥ ५६

जशी चातके वांछिनी अंबुदातें । चकोरें जशी पूर्णचंद्रामृतातें ॥
जशी चक्रवाकी तमोग्रासि पाहे । तशी राधिका कृष्ण चिंतीत आहे ॥ ५७

वियोगज्वरें थोर दुःखीत जाली । म्हणे पापिणी व्यर्थ गेहासि आली ॥
शठाचा कसा बोल मानूनि सत्य । मतें घाडिलें येथ केलें अकृत्य ॥ ५८

गरळ पंकसमान विलेपणें ॥ भुजगतुल्य समस्तहि भूषणें ॥
विरहिणीस महार्णववेधना । म्हणत सत्वर पाव जनार्दना ॥ ५९

स्वर्भानुग्रस्त शशिमंडळ पौर्णिमेचें ।
तैसे वियोगविरहें मुख राधिकेचें ॥
हे नायका सकळ येथुनि पूर्व उक्ता ।
जाली असे कविवरा विनवीत वक्ता ॥ ६०

करावा जरी ग्रंथ येथूनि पूर्ण । रसें भक्तिच्या वासना पैं अपूर्ण ॥
हरीराधिकेसी करूं भेटि भावें । महर्नी महाआदरें आयकावें ॥ ६१

अथानंतरें दूतिका स्वस्थ गेहीं । असे बैसली सौख्य मानून देहीं ॥
अकस्मात चिंता करी देवराजा । म्हणे राधिका धाडिली म्यां निकुंजा ॥ ६२

मानूनि माझी वचने यथार्थे । गेली असे होइल काय तेथें ॥
श्रीकृष्ण येईल न ये कळेना । साक्ष्यात गेल्याविन जाणवेना ॥ ६३

उल्हास तीचे मनदेवतेतें । जाला निकुंजाप्रति जावयातें ॥
यानंतरें तेथुनि ते निघाली । चाले मदोन्मत्तगजेंद्रचाली ॥ ६४
कशी घालिली वात टेऊनि मार्गी । मना कारणेंही म्हणे बैस ऊगी ॥
समारंभ देखे वनीं माधवाचा । पुढें देखिला कुंज तो माधवाचा ॥ ६५
येऊनि सत्वर लतासदनांगणांत । विस्मीत होऊनि म्हणे न दिसे अनंत ॥
कोमाइलें मुखसरोरुह राधिकेचें । देखोनि लज्जित बहू मन दूतिकेचें ॥ ६६
अशी दृष्टि दोघीजणींची मिळाली । त्रपेनें सखी ते नतग्रीव जाली ॥
न बोले न पाहे मुखीं म्लान शोभा । म्हणे धन्य गा धन्य तूं पद्मनाभा ॥ ६७
निजमनांत विचारित राधिका । अ(ति) विलज्जित होउनि दूतिका ॥
उभि असे जरि ईस न पूसणें । तरि महंतपणासहि ये उणें ॥ ६८
बापुडी सखि असे बहु भोळी । अंतरीं कुटिल तो वनमाळी ॥
धाडिले तरि मजप्रति आली । भाविनी गति विचित्रच जाली ॥ ६९
म्हणे राधिका वो सखे बैस बोजा । तुझा काय अन्याय वो सांडि लज्जा ॥
महानष्ट तो कृष्ण तूं जाणसी ना । सुरा कारण अंत त्याचा कळेना ॥ ७०
सखि ये करुणा तरि त्यासि न ये । परि आणिक भाव वदोंच न ये ॥
जनि संस्थिति संहरणादि करी । परि पातक पुण्य मनीं न धरी ॥ ७१
नानापरी रूप धरी अभेद । दहाशतें मस्तक नेत्र पाद ॥
तैसाचिही होउनि शून्य राहे । वोडंबरी तो बहु जाणताहे ॥ ७२
सखी हे अशी लक्षणें माधवाची । कशी मानिली सत्यवाणी तयाची ॥
म्हणे दूतिका सांग वृत्तांत त्याचा । न मानीतही मी पुढें बोल साचा ॥ ७३

सखी म्हणे बरें रितीं । कथा वदे मजप्रतीं ॥ :-
म्हणे तयेसि राधिका । प्रसंग आइके निका ॥ ७४

स्वच्छ मानस करी निज आली । धाकुटा जड असे वनमाळी ॥
कंसभूपति असे मथुरेचा । होय मातुल सखा तरि त्याचा ॥ ७५
तदा कंस तो पाठवी पूतनेतें । महाआदरें बाळ पाहावयातें ॥
ममत्वें कशी बापुडी तेथ आली । यशोदेन ते आसनीं बैसवीली ॥ ७६
म्हणे पूतना आपुला पुत्र आणी । तिनें दीधला तो पुढें चक्रपाणी ॥
स्तनातें मुखीं घातले प्रीतियोगें । मिठी घालुनी शोकिता होय वेगें ॥ ७७
स्तनद्वंद्व तत्काल निर्दुग्ध केलें । आसुकपान(?)[1] या नंतर आदरीलें ॥
करि ग्लानि नानापरी कृष्णनाथा । धरा जाउदे होतसे थोर येथा ॥ ७८

---

१ 'असुध' असें असावें.

न सुटे कसे सोडितां मूख त्याचें । बळें नेणु पाहे शरीर त्वचेचें ॥
सिरा वोढती थोर दुःखीत जाली । म्हणे वीवसी जीव घेया उदेली ॥ ७९

कसें विघ्न निर्माण जाले महेशा । पुढें राहिली सर्व संसार आशा ॥
अकसात पंचत्व टाकून आलें । पिताबंधुमातेसही अंतरीलें ॥ ८०

जरी आजि तू जाउ देशील बाळा । तरी येत जाईन मी वेळोवेळां ॥
न सोडीस घेसी जरी प्राण नीकें । तरी खुंडले येरझारे न येकें ॥ ८१

कंठी तीचा जोवरी प्राण होता । तोपर्यंत ग्लानि केली अनंता ॥
कैसा जाला क्रूर काळासमान । पंचत्वातें पावली तेच जाण ॥ ८२

पूतनावपु पडे महीवरी । जेंवि वज्रगिरी मस्तकावरी ॥
ऊठला परम शब्द अंबरी । धावली त्वरित नंदसुदरी ॥ ८३

हा हा म्हणे थोर आकृत्य जालें । सर्वस्व ईचें तरी अंतरीलें ॥
तीवेगळे वालक दूर केलें । हें कर्म यानें अति दुष्ट केलें ॥ ८४

वीषे भरोनी स्तनमंडळातें । आली असे भाव्रतसे जनातें ॥
हे तो न माने मजलागि कांहीं । या कारणें मृत्यु ... हीच नाहीं ॥ ८५

याचें त्याला ठाउकें सर्व आहे । कांहीं केल्या सर्वथा मृत्यु नोव्हे ॥
सर्वामध्यें स्त्री अवध्य स्वभावें । तेही याणें मारिली दुष्टभावें ॥ ८६

पुढें वाढतां पापबुद्धिन भारी । करूं शीकला साजणी थोर चोरी ॥
भिकें लाविले आत्मलोकासि येणें । दिसे तीतुकेंही हरी दुष्ट गूणें ॥ ८७

स्नानार्थ गोपी यमुनेस जाती । कैसी कपाटे दृढ लाविताती ॥
घेऊनिया गोपकुमार कीती । श्रीकृष्ण तेथें मग जाय दूती ॥ ८८

सखे टेविले सर्वही द्वार देसी । कसी कूलुपे ऊघडीली त्वरेसी ॥
प्रवेशोनिया आंतरी पापबुद्धी । तुपे थीजली व्याहडी खाय आधीं ॥ ८९

मसृण घेऊनिया करपंकजी । सकल सक्र महीवरि हा त्यजी ॥
त्वरित काढुनि खाय सुखी भरी । मग दही दुध दे सखिया करी ॥ ९०

आदरें तेथ वैसोनिया खातसे । उरले ते वहिस्याहि देतसे ॥
दुग्ध घेउनि उभा उभि श्रीहरी । रिक्त पात्र करि चूर्ण पृथ्वीवरी ॥ ९१

करी सर्व नि.शेष पूसोनि वोटे । यथापूर्व लाऊनिया ते कपाटे ॥
निघे तो पुढें योरुती गोपनारी । धरा गे धरा चोर सर्वस्व हारी ॥ ९२

उघडिती ललना निज मंदिरें । तव समस्त घरांतहि सापरे ॥
पसरले दहिदुग्ध महीवरी । म्हणति घात किती करिसी हरी ॥ ९३

मजाकारणें धूमकेतुस्वभावें। उदेला असे काय तेहीं करावें ॥
महाराज तो नंदसूनू तयाचा। जनातें नये बोलता दुष्टवाचा ॥ ९४

नयन चक्र करी वनिताकडे। कुचतटावरि टाकितसे खडे ॥
सकळ जाउनि नंद वधूप्रती। म्हणति आवरि वो सुत दुर्मती ॥ ९५

बांधे यशोदा बहुसाल भारी। कांहीं न संडी निजवृत्ति शौरी ॥
जो मातृबंधु प्रिय होय मामा। तो मारिला आइक कंसनामा ॥ ९६

महादरें सखी म्हणे। कथा समूळ सांगणे ॥
सुधासमान सुस्वरें। वदे तयाप्रती बरें ॥ ९७

अक्रूरासी बोलिला कंसराजा। नंदापासीं जाय तूं शीघ्र वोजा ॥
बोले त्यासी वीनती आप्तभावें। भेटो पुत्राकारणें पाठवावें ॥ ९८

मनीं खेद मानूनि अक्रूरवेगें। निघे ते...

[ १०० ते १२९ श्लोक नाहींत ]

वचन सत्यच मानुनि दूतिके। त्वरित जाउनिया म्हण राधिके ॥
त्यजि विकल्प मनिंहुनि सुंदरी। न भरतां पळ येइल तो हरी ॥ १३०

दूतिके हा समाचार राधेप्रती। सांगसी तूं क्षणी हे असी विनती ॥
जें तुवां देखिलें आपुले लोचनीं। तें करी गोप्य बोलो नको वो जनी ॥ ३१

श्रीकृष्णइंदुवचनामृतदर्शना हे।
दूती महातृषितचातक अंगना हे ॥
संतृप्त होउनि पदांबुज माधवाचें।
वंदी बहूत कृतकृत्य शरीर तीचें ॥ ३२

हरीचा पदस्पर्श इच्छीत वोजा। करी याग कीती बळी दैत्यराजा ॥
वधू गौतमाची शिळा थोर जाली। कशी स्वर्धुनीनें अशी वस्ति केली ॥ ३३

पादारविंदमहिमा पुरुषोत्तमाचा।
बोलो शकेल कशि काय चतुर्थवाचा ॥
पाप स्वसंचित महाक्षयमाण पुण्ये।
दूतीस प्राप्त...इपु(?) इतुकीं शरण्ये ॥ ३४

दूतिका मग उठोनि उत्तमा। घी.करी निजरपा तिलोत्तमा ॥
चालली करुनि खंज ममाते। तेथ काय गणना पवनातें ॥ ३५

राधा करी तर्क अनेक चित्ती। अद्यापि का पा न पवेचि दूती ॥
असेल जेथे नृप यादवाचा। प्रवेश तेथे न घडेल तीचा ॥ ३६

टाकोनिया जरि सखी सदनासि आये ।
तेव्हां निकुंजसदनी मज काम काये ॥
किंचीत पूर्वकच पाहिन कृष्णनाथा ।
यैसे विलोकुनि विलोकित पूर्वपंथा ॥ ३७

म्हणे कामिनी दूरुनी दीसताहे । परी दूतिका काय होईल नोव्हे ॥
जरी होय ते तीसवें कृष्ण नाहीं । मनोभू किनी बाण मारील देहीं ॥ ३८
उदेले कसें कर्म हे थोर माझे । शरीरी अलंकार होऊनि वोझें ॥
स्मरे कृष्ण कृष्णप्रभा थोर जाली । कसी आंतरीहूनि बाहेर आली ॥ ३९
मनोरम्य रूपास हो नास जाला । अळीकीटकन्याय होऊनि गेला ॥
असो दूतिका यापरी ये समीप । ससतोष देखे तिचें दिव्य रूप ॥ ४०
वदे राधिका दूतिके कष्टलीसी । किती वेळ आलीस गेलीस कैसी ॥
म्हणे येरि येजाय आवां घडेना । मतें भेटला कृष्ण तो जाणसी ना ॥ ४१
विरहिणी मग पूसत आयके । सखि कसें म्हटलें यदुनायकें ॥
वद मजप्रति तथ्य नितंबिनी । कवण काळवरी वसिजे वनी ॥ ४२
त्यजिसि जरि सर्व विकल्प सखी । तरी येइल कृष्ण करिल सुखी ॥
मग येरि म्हणे बहु तू कुशला । परि नेणसि हे परमार्थलीला ॥ ४३
दिनरात्रीं असे हृदयामीतरी । भुवनत्रय तो उदरांत धरी ॥
अणुमात्र असे वदसि सहसा । मग तेथ वदोचि विकल्प कसा ॥ ४४
उभयता वदनी मृगलोचना । करुनि निश्चल चित्त शुभानना ॥
दिन निशा क्रमली अवधीच ही । प्रगटले रवितेज दिसे मही ॥ ४५
शशीपूर्ण तो कामि तीच्या मुखासी । करी द्रोह हा दीधला शाप त्यासी ॥
अरे रम्य आम्हासी पैं केवि जामी । रवी बिंब देखोनि तू म्लान होसी ॥ ४६
म्हणोनी निशाकांत हा नील जाला । बहू चक्रवाकास संतोष जाला ॥
अहो हे असो राज मार्तंड जोडी । अळी पद्मकारागृहीहून सोडी ॥ ४७
चंद्री दिशा पूर्ण सनाथ जाली । आलिंगणे देउनिया निवाली ॥
वक्रांगरागे तरुणीस जैसें । असार केले मज मान्य यैसें ॥ ४८
अयानंतरें देखिला कर्मसाक्षी । नमस्कारुनी पंथ राधा निरीक्षी ॥
हृषीकेश तो देखिला दिव्यरूपी । असे मूर्ति साकार पुण्यस्वरूपी ॥ ४९
अतसीकुसुमासम वर्ण दिसे । हृदयीं द्विजलांछन शोभतसे ॥
मिरवे शुभ अंबर पीत कसे । अचिरां शुभ नारिच शोभतसे ॥ ५०

गळा होति या पादपर्यंत माळा। रुळे वैजयंती मनोरम्यशीळा॥
प्रभा थोर वक्षःस्थळी कौस्तुभाची। असे निर्मिला नाभिपद्मीं विरंची॥ ५१
मीनाकारें कुंडलें कर्णमौळी। त्याच्या तेजें लोपला आर्कमौळी॥
हातीं वेणू वेसनःप्राय जैसा। माथा शोभे दिव्य कोटीर जैसा॥ ५२
सुकृतास मयोर अगण्य करी। म्हणु पिछो शिरि जगदीश धरी॥
सकलाभरणास वरिष्ठ असे। खग वाहन ज्यासहि मानितसे॥ ५३

राधा आणि सखी अश्या उभयता श्रीकृष्ण देखोनि तो।
येतां सन्मुख शीघ्र विश्वरचना लीलेन जो निर्मितो॥
पाळी आपण दोरटीं हरितसे जो सूर्यकोटिप्रभा।
तो घेऊनि मनुष्यरूप विचरे येऊनि राहे उभा॥ ५४

आतां करुनी कविवरा विनवीत आहे। उत्कारता प्रथम सांगितली अशी हे॥
यानंतरें सकल लक्षण खंडितेचें। बोलेन पूर्ण वरदान गजाननाचें॥ ५५

श्रीचिन्हांकित देह पूर्ण बरवा दिव्यांबरें झाकिला।
पायापासुनि उत्तमांगवरि तो राधेन न्याहाळिला॥
बोष्टीं कज्जल देखिलें मग म्हणे अन्यांगना चुंबिली।
लक्ष्या लागलिसे ललाटविषयीं ते खंडिता कोपली॥ ५६

अन्यांगना भोगुनि सर्व रात्रीं। ते स्पष्ट चिन्हें परिपूर्ण गात्रीं॥
कोपे वदे सुंदर पद्मनेत्रा। भले तुम्ही यादवजी पवित्रा॥ ५७
असा कांत तीचा प्रभातेंस आला। तया देखतां देह संतप्त जाला॥
बहू भोग भोगोनि आलेति आतां। वदे राधिका मानसीं कोपयुक्ता॥ ५८
विरह देशधडी करुनी पहा। प्रकटला अभिमान बळें महा॥
करुनि लोचन वक्र पराङ्मुखी। बसली ते अतिदुःखित सारखी॥ ५९
सन्मूख आला हरि आदरेसी। बद्धांजुली होउनि राधिकेसी॥
केला नमस्कार पदद्वयासी। बोले वृथा कां मज कोपलीसी॥ ६०
तुवां देखिला काय अन्याय माझा। दिवा रात्रि मातें निजध्यास तूझा॥
तदा ते म्हणे त्वां शठा न बोलावें। जिचे चुंबिले नेत्र तेथेंचि जावें॥ ६१
सुझाविली मानवती न लाजसी। भाळीं आळिता दिसतो न देखसी॥
आदर्श हा घेऊनियां विलोकिजे। आसक्त जेथें तिकडेचि जाइजे॥ ६२
यरें भोगिले सौख्य आलिंगनाचें। उरीं दीसते चिन्ह पीनस्तनाचें॥
असे पंक हा लागला चंदनाचा। ठमे दीसती बोलसी काय वाचा॥ ६३
क्षपा सर्वही जागृतीसालि गेली। असे रक्तता लोचनीं पूर्ण आली॥
कर्में कर्म हे लोपिसी दानवारी। गळा कंकणाचे वण स्पष्ट भारी॥ ६४

दशनअंक दिसे अधरीं हरी। उमटला कर जो हृदयावरीं ॥
मगमगीत असे मृगनाभिचा। परिमळ प्रतिपक्षशरीरिचा ॥ ६५

पिसुर हे कुसुमा अळकांगुळी। कितिक तो पहिलेहि न टाकिली ॥
प्रगटले परि पाहि खगासना। कुटिल हे नकळे तुझि वासना ॥ ६६

अतिसुगंध फुलेल शिरीं भले। भिजविले कच वाहिर चालिले ॥
सकल भोगुनिया हरि तूं कसा। विरत होउनिया छळिसी असा ॥ ६७

राश्री नेली तीन देवा। सुखी केले तुझ्या जीवा ॥
आतां त्यां तीपासी जावें। थोरा भोगातें भोगावें ॥ ६८
जे स्त्री तूतें लत्ताघातें। भाली मारी रे कौंसारी ॥
तीच्या संगें सौख्या भोगी। मायावेषी येथें येसी ॥ ६९
हरि म्हणे शुभाननें। कृपा करी निरंतरें ॥
उपेक्षील आमुनें। तरी जे धन्य हे तुतें ॥ ७०

आजिचा येक अन्याय हा सुदरी। तूं क्षमापात्र या राख मासी यरी ॥
वदे होईन लोकत्रयाभीलरीं। हे वदोनी नमस्कार घाली हरी ॥ ७१

यहु काकुलति मधुसूदन हा। विनवीत असे अनुमान पहा ॥
अभिमानवती न भजे न वदे। जगदीश विषाद धरुनी वदे ॥ ७२

अनेकपरी रागिटे तूज वोजे। किती प्रार्थिता चीत्तु कांहीं न भीजे ॥
असो मी तुझ्या कुंजगेहासि जातो। करी घात तूझा महाकोप होतो ॥ ७३

म्हणे कामिनी तू न येसी येरोळी। तरी आमुची काय संपत्ति गेली ॥
स्वयें नष्ट जाणेसि रे तू निशाते। सुखें माधवा जाय अन्यस्थळाते ॥ ७४

सांगतो कवि कवींद्रसज्जना। खंडिता द्वितीय आणिली मना ॥
राधिकाहरिस भांडण आहे। त्या निमित्त कलि हा तरताहे ॥ ७५

अपमान करुनी पतिनमनी। लघुताच घर दे बहुतारचनी ॥
मग तो रमला वरि हे वनिता। तरी तस म्हणा कलहतरिता ॥ ७६

सजल मुदिरवर्णा स्पष्ट कोपें निघाला।
अभिनव गति त्याची अन्य कुंजासि आला ॥
करनि विमल शय्या कोमला पल्लवांची।
विरहविकल वैसे पुत्र ज्याचा विरची ॥ ७७

श्रीकृष्ण गेला मग राधिकेस्नी। बोले सखी व्यर्थचि कोपलीसी ॥
आता रतीचा पति पुष्पबाणें। जे पीडितो ने तिथिही न जाणे ॥ ७८

वचन परिसतां तो कोप निर्मूळ जाला ।
त्वरित विरह कैसा देहे गेही निघाला ॥
बहुतविरहतापें काय संतप्त जाले ।
क्षणभरि न गमेही पूर्ण वैराग्य आले ॥ ७९

वचन आयकतां विरहानलें । सकल देह तिचे बहु आफले ॥
निज मनीं बहु दुःखित राधिका । तळमळी विरहे सहदूतिका ॥ ८०
मग म्हणे शिवशंकर पार्वती । कनकगर्भ उमेश शिवाप्रती ॥
गिरिश भूतपती भुवनेश्वरा । रतिपतीहरणा वर दे हरा ॥ ८१
रतिनाथ शरी मज पीडितसे । अति दुष्ट वसंत सवाह्य असे ॥
बहु कोकिल मंजुळ बोलति हे । हरिवाचुनि देह नको सखि हे ॥ ८२
बहु मंजुळ मंद सुगंध महा । मलयानल पोळित देह पहा ॥
सखि कोकिल हंस मयूर सुधा– । सम बोलति बोल कसे बहुधा ॥ ८३
गरळासम लागतसे कस्तुरिका । कुशले करी यासि प्रयत्न निका ॥
यदुराज मतें मिळतील असें । करी पुण्य घडेल तुतें सुरसे ॥ ८४
शीतल चंदनलेप शरीरीं । जाळितसे सखि अंतरि भारी ॥
हें गमतें मलयानल येळा । बोलत सुंदर चंपकमाळा ॥ ८५
मृगनाभि सुगंधित दूर करी । कनकाभरणें अवघी उतरी ॥
यदुनायक मेळविदील मतें । तरि देह उरेल असे गमतें ॥ ८६
करतळीं मुख ठेउनि कामिनी । धरुनि मौन वसे गजगामिनी ॥
नयनिचें जल कुंजगृहावरी । पडतसे मग वाहत उदरीं ॥ ८७
तिचे नेत्र नोव्हे तिते मेघ साचे । कुच स्पष्ट हे शैलजांबूनदाचे ॥
नव्हे उदर स्वर्णभूमीच आहे । वरी स्पष्ट जाली नदी पूर वाहे ॥ ८८
राधिका वदन पंकज पाहे । म्लान होय विरहानलदाहें ॥
भस्म होइल मतें गमताहे । देह तूं सखि हे परि पाहे ॥ ८९
कृष्ण धिःकरुनिया दवडीला । याचिलागिं रिपु मन्मथ जाला ॥
हें मतें गमतसे प्रियरूपें । सर्वथा हरिविना मज दीपे ॥ ९०
भानी पिता कृष्ण मनोभवाचा । राधेन केला अपमान त्याचा ॥
तो काय आतां कमलाननेनें । करील मौल्या गमते मनानें ॥ ९१
हे अमो विकलवारिजानना । स्थीरता न उपजे कहीं मना ॥
ग्लानिपूर्वक वदे सखि जाईं । द्वैतमिर्दलन घेउनि येईं ॥ ९२
नयेनाहुनि दुर्जन कोण असे । परदोष विलोकित सादरेसे ॥
यदुनाथ ... न देखने । तरि कां घडता प्रतिबंध मतें ॥ ९३

अभिनव रसने तू घेसि सर्वा रसाचा ।
फुकट कलह केला काय बोलो सुचाचा ॥
विरहदहन कैसा लागला देह गेहीं ।
विधिलिखित न चूके बोल कोन्हास नाहीं ॥ ९४

रसज्ञे तुतें याचि या लोचनासी । बरें ठेविजे त्यामधे साच यासी ॥
रसातें न जाणेसि मौन्यत्व देती । कसें आपणावेगळे नोळखेती ॥ ९५

नयन हे रसना विधी जरी । न करिता तरि काय लघू तरी ॥
वदति ना अगुणास गुणासही । परजनी नयनी नसते कही ॥ ९६

असा प्रभूच चूकला । वदे ती दु खमकुला ॥
जरी मिळेल यादऊ । तरी असेल हा जिऊ ॥ ९७

खजेष्टिनयना वदे असे । आयकोन वदली सखी असे ॥
का विलाप करिसील तू सुदरी । वीनती करुनि आणिन तो हरी ॥ ९८

ऊठिली हरिणलाछनानना । चालली मधुपुरीप्रती वना ॥
पावली मग लतागृहाप्रती । देखिला दुरनि सिंधुजापती ॥ ९९

मध्यें क्षीरार्णवाचे फणिवरशयनीं जो निजे आत्मलीला ।
आगा लक्ष्मि ज्याचे चरण निजकरें नीववी पुण्यशीला ॥
जो भ्रूविक्षेपमात्रें त्रिभुवन रचितो तो तिने कुजगेहीं ।
राधेचा सापराधी विरहविकल हे थोर आश्चर्य पाही ॥ २००

लीलावतारी विरहज्वरानें । व्याकूल बैसे तव दूतिनेनें ॥
अंघ्रिद्वयातें प्रणिपात केला । देखे तितें सावध पूर्ण जाला ॥ २०१

विषमशरशराची वेधना थोर जाली ।
विरलवदनपद्मीं ग्लानता पूर्ण आली ॥
मग म्हणत सखीतें काय आलीस येथें ।
मज उपरि सुनेत्रे वर्तले काय तेथें ॥ २०२

वदे यावरी दूतिका केशवासी । वियोगानले जाळिलें राधिकेसी ॥
तुझी ही अवस्था असे तेचि योजे । उठी चाल होई सुखी तीस कीजे ॥ २०३

हे आयकोनि वचना गरुडध्वजासी ।
सतोष थोर उपजे विधि खंड ज्यासी ॥
मजूळ मजूळ वदे सखि जाय पूढ ।
शृगारसेज करिसी तरि पुण्य गाढें ॥ २०४

अनुज्ञा घरीली शिरीं माधवाची । जशी आदरें शुद्ध माळा फुलांची ॥
त्वरें चालतां पूर्व कुंजासि आली । तिसी राधिकेसी घरी भेटि जाली ॥ २०५

[ २०६ ते २२७ श्लोक नाहींत ]

( 'सरस्वती मंदिर' मासिकामधून घेतलेले श्लोक )

नारायणाची अगणीत नामें । नि.काम ध्यावी अथवा सकामें ॥
आहे असा निश्चय विठ्ठलाचा । हा ग्रंथ केला हरिराधिकेचा ॥ २२८

गणपतिवरदानें स्फूर्ति अद्भुत आहे ।
मृदुपदरचनेचें श्लोकसाहित्य पाहे ॥
कुणि म्हणतिल वाचा काय भाषा मऱ्हाटी ।
परि सुरसजनातें प्रीति होईल मोठी ॥ २२९

रात्रंदिवा वामन मूर्ति चिंती । तेणें अविद्या वसती दिगंती ॥
दृष्टीस दूजें अणुही न भासे । सर्वांस्थळीं ईश्वर एक भासे ॥ २३०

गोत्र श्रीवत्स ज्याचें श्रुतितरि दुसरी जीवनस्तंभ शाखा ।
व्यापारी वृत्ति ज्याची द्विरद गुरु असे त्यासि संतुष्ट देखा ॥
आचारें शुद्ध आहे सकळ कळपुरी सर्वदा वस्ति ज्याची ।
तेणें हा ग्रंथ केला प्रकट तरि असे विठ्ठल ख्याति ज्याची ॥ २३१

चतुर देश वऱ्हाड महीतळीं । जवळि गांव असे तये मंडळी ॥
फणिलताभव भीजति त्या जळी । वसतसे कवि विठ्ठल त्या स्थळीं ॥ २३२

कुमारवक्त्राग्निशरेंदुयोगें । शके गणावी विपरीतमार्गें ॥
आनंदसंवत्सर माघमासीं । निशीशवारी तिथिपौर्णिमेसी ॥ १३३

शर्वनाक्ष आदरी । योग शोभनाख्यही ॥
वाक्पतीच वृश्चिकीं । सूर्य कर्कटी तयीं ॥ २३४

असे योग होते तई ग्रथ केला । गणेशप्रसादेच संपूर्ण जाला ॥
जना लोभमोहादिकातें त्यजावें । अनेकेपरी वासुदेवा भजावें ॥ २३५

शब्द मान्हाष्ट्र कांहीं घडेना जना । हे पुराणीच बोलेति आणा मना ॥
बोलती मूर्ख वाक्यें अशी सर्वथा । याचिलागी मिया बोलिली हे कथा ॥ २३६

देशनाभिनयन स्थिर पाहे । सर्व पद्यरचना इतुकी हे ॥
जाणती चतुर हे रसवाचा । ईश्वरार्पण वदे कवि वाचा ॥ २३७

\+ + + +

रसाबाणनाणेंदुतुल्यें शकेही । तथा शुक्लसंवत्सरी सर्व पाही ॥
रवी दक्षिणाशेस होता तदाही । महा जाण वर्षाभिनेत्रा ऋतूही ॥ १ ॥

---

१. शके १५३६ २. २३६ ३. शके १५५१ हा प्रतीचा लेखनकाळ.

नामा पाठककृत

# चंद्रहास्यकथा

॥ श्री ॥

श्रीसद्गुरु चिन्मात्रमूर्तये नम ॥

तेवेळीं वारू चंदनें चर्चिलें ॥ तोडर पाई लेवनीलें ॥ पुंसी मुरडोनी घातलें ॥ रत्नीयद्ध आवळे ॥ १ ॥ घोंस मुक्ताफळाचे चहुंघडी ॥ शुध पधरीयांची सांकळी कडी ॥ पुष्पमाळा घातलीया वरपडी ॥ परीमळ वहु आंगकांती ॥ २ ॥ शुध दीहीचें छाया प्रभाव ॥ वरी कुंकुम महते याचे भाव ॥ ठाई ठाई चवकत नाचनी देव ॥ भाळीं शोभती सुवर्णपत्रें ॥ ३ ॥ मागें माहारथाचीया कोडी ॥ आश्व गजरथ परवडी ॥ नाहि वीरास संकडी ॥ घोडे नीघाले पुढारें ॥ ४ ॥ घोडे जाती जे प्रदेशे ॥ भुमंडळीचे राजे सरीसे ॥ अपूर्व वर्ते कैसे ॥ धनोर्धरा चंद्रहास्या ॥ ५ ॥ नगर कुंतलापुर देखिले ॥ मागा दलभार सवीधलें ॥ कृष्ण अर्जुनसवे चालीले ॥ छपन कोटी यादवेमी ॥ ६ ॥ अनुशैल्य साम्रकेतु ॥ अनीरुद्धवर्मा वीरयातु ॥ येकाहुनी एक माहाख्यातु ॥ क्षोणी अर्वुजे घालिले ॥ ७ ॥ रत्न मुकुटाची दीप्ती उपणली ॥ तेणें सूर्यप्रभा आच्छादिली ॥ पडे पृथ्वीवरी साउळी ॥ मेघडंबर छत्राची ॥ ८ ॥ कनकदंड चवराचे ॥ कुंचे मयंडीती मयोरपत्राचे ॥ बंदीजन गर्जती कैवाड शब्दाचे ॥ हातीयेर करूनियां ॥ ९ ॥ तव आकसात देखुन अदस्य वारू ॥ वीसीत जाला धनुर्धरू ॥ दैन्या प्रवर्तला हाहाकारू ॥ म्हणती शामकर्ण वारू कवणें नेला ॥ १० ॥ काय नीघाले गगन मंडळी ॥ कीं प्रवेशले पाताळीं ॥ कीं नेले दीर्घ सडळी ॥ गंधर्वादिकीं ॥ ११ ॥ तव अकस्मात गगनीं ॥ येतु देखिला नारदमुनी ॥ नमस्कारिला सकळ जनी ॥ कृष्ण अर्जुनें परियेसा ॥ १२ ॥ पार्थे पूर्व वृत्तांत नीरोपीलें ॥ म्हणे जी वारू येथें अदस्य जालें ॥ हांसोनी नारदमुनी बोलिले ॥ तुम्हीं काय गा नेणा ॥ १३ ॥ चंद्रवतीपुर पाटण ॥ तेथें घोडे नेले आहे जाण ॥ तये नगरा चंद्रहास पुण्यपावन ॥ वैष्णवधर्मी वीश्वासु ॥ १४ ॥ हातचीत सदा वैस्णु धर्म ॥ ह्रदई केवळ नारायेण वर्म ॥ कुंतलेश्वर राज्यसवें अर्पुन ॥ वनांतरीं सांडीला ॥ १५ ॥ दुष्टबुधीप्रधाननंदनी ॥ प्रणीजेल चंद्रहासासीं जाणोनी ॥

कैरळाधीपती चौशी जन्मोनी ॥ कळींद्र रायें प्रतिपाळीलें ॥ १६ ॥ ईश्वरकृपें कुंतळा-
पुरा ॥ पावला चंद्रहास्य नगरा ॥ आजानुबाहु नरवीरां ॥ भुजादंडप्रतापीया ॥ १७ ॥
भूपाळ सोमवौशी सूर्यवंशी ॥ वीरचंद्रहास्यासी ॥ परी कोजे ऐसा नाही पृथ्वीसी ॥
यासी न पुरती भूपाळ ॥ १८ ॥ हें नारदें सांगीतलें ॥ तव अर्जुनें वीनवीलें ॥ राऊळें
यरवें नीरोपीलें ॥ चंद्रहास्याचें आख्यान ॥ १९ ॥ येवढें सामर्थ्य तयासी कायसें ॥
केवीं घल दीधलें लक्ष्मीनीवासें ॥ तेणें तप केलें कैसें ॥ पावला ऐसें कैसेनी ॥ २० ॥
कवण कुळ कवण ग्रोत्रु ॥ तव नारद बोलिला सुरगु ॥ मानी अभीख अर्जुना
वीश्वासु ॥ चंद्रहास्या रायाचा ॥ २१ ॥ धर्म सादर यज्ञ दिक्षा ॥ ते करूं नये
वीवक्षा ॥ येरु म्हणेजी परीक्षा ॥ येणें समग्रें चाड नाहीं ॥ २२ ॥ गोस्टी करितां
पुण्य पुरूशाची ॥ व्यग्रता आसों नये मनाची ॥ कथा सांगतां पवीत्रांची ॥ परम
संतोश होतसे ॥ २३ ॥ तव अर्जुन म्हणे ताता ॥ पूर्वी मज ब्रह्म उपदेशीतां ॥
राऊळें सांगीतली कथा ॥ याचा सविस्तार ॥ २४ ॥ तें मीं नव्हेची सादरू ॥ तव
बोलिला रूशेश्वरू ॥ पूर्वी रावो कैरळाधीपती थोरू ॥ स्वधर्मी वीख्यात ॥ २५ ॥
प्रजापाळक भूतकृपा ॥ ऐसें बहुत काळें जें पां । ते परिस पां साक्षेपां ॥ चित्त
देउनियां ॥ २६ ॥ काय गा अपूर्वपरी ॥ राजलक्षणें सर्व शरीरीं ॥ ऊंच स्थानीं
ग्रह निर्धारीं ॥ सामुद्रिकीं बरवीची ॥ २७ ॥ कीं त्या कैरळाधिपतीयाचें नगर
वेढिलें ॥ युद्ध सकळांसी जाले ॥ राव कैरळाधिपती ते वेळे ॥ मारिला देख ॥ २८ ॥
मग अग्निप्रवेश केला भार्या ॥ तीन वरूपें पाळिला धाया ॥ कुंतळा पुरा नेला
वाढायां ॥ तेथें बापाप्रति पाळिला ॥ २९ ॥ की उजर पडित ते धाया जाळीं ॥
साहावे दिवसीं देवाज्ञा जाली ॥ आति थोर जाजावली ॥ चंद्रहास्यालागुनी ॥ ३० ॥
पाठीं निराधार निराश्रित ॥ नगरीं लेंकुरामाजि असे खेळत ॥ जे जेथें देखत ॥ ते
तयासि अन्न घालित पाचारूनी ॥ ३१ ॥ खेळतां सर्वे बाळा ॥ अपूर्व वर्तेलें भूपाळा ॥
शुद्ध शालिग्राम शिळा ॥ सांपडली चंद्रहास्यासी ॥ ३२ ॥ ते मुखीं घातली चंद्रहास्यें ॥
कृपें बोलाविती अभ्यंगमिसें ॥ सकळ विश्व सौरसें ॥ अभ्यंगु करविनी ॥ ३३ ॥
आधी न्हाहणी शिलेसी ॥ पाठीं आभ्यंग चंद्रहास्यासी ॥ नैवेद्य आर्पी सेळेसी ॥ मग
जेवी आपण ॥ ३४ ॥ घरा बोलावीती जे बाळें ॥ ते आधुं देती तुळसी दळे ॥ आर्पी
साळीग्राम शीळे ॥ पाठीं जेवी आपण ॥ ३५ ॥ सर्वे लेंकुराची मांदी ॥ खेळतां
जातसे ज्या वीदीं ॥ जैसा चंद्रतारांगणांमधीं ॥ तैसा लेंकुरांत मीरवतसे ॥ ३६ ॥
पाहों ठाकती दोन्हि वीभागी ॥ कोण्ही लेववीती टोपी आंगीं ॥ म्हणती बारे
भुकेलासी वेगीं ॥ जेउये पां चंद्रहास्या ॥ ३७ ॥ येकी बोलवीनी घरासी ॥ पाठीं
वारीवाती येकमेकीसी ॥ म्हणे म्या आवंतीलें चंद्रहास्यासी ॥ याचेनी गुणत्रये
करूणी ॥ ३८ ॥ स्त्रीया धावती सांघातें ॥ येकी वारीती येकमेकीतें ॥ मी जेववीन
चंद्रहास्यातें ॥ ऐसे तयातें घेउनी जाती ॥ ३९ ॥ तव प्रधान दुस्टबुद्धीचा घरीं ॥ द्वीज

तर्पण करीती यरीनीयापरी ॥ मोद्दास्याव मांडला तयें आवधरीं ॥ रूपी तपी तापस ब्राह्मण बोळाविले ॥ ४० ॥ तव चंद्रहास्य खेळतां देखिला ॥ प्रधानें सामोरा योलावीला ॥ तुहीं जेवी म्हणुन नीरूप दीधला ॥ येरें स्नान सारिलें ॥ ४१ ॥ सारीली देवतार्चनविधी ॥ नैवेद्य समर्पीला आधी ॥ जेउं बैसला ऋपीमाजी ॥ परी अवधीयांत लक्षणयुक्त ॥ ४२ ॥ तीर्थतुळसीसमवेत ॥ ऋपी ब्राह्मण पाहताती विस्मीत ॥ प्राणाहुती आसे घेत ॥ लक्षोणोक्त परियेसा ॥ ४३ ॥ ऋपी जेवीले सकळिक ॥ वीडे झाले भक्ती सात्वीक ॥ पाटी आक्षता घेउनी नावेक ॥ मंत्रवेदीकीं आदरीलें ॥ ४४ ॥ आवघे आसीर्वाद देत ॥ राज्य करी पां पुत्रासमवेत ॥ राग आला प्रधानाचीया चीता ॥ मग काय म्हणतसे तो ॥ ४५ ॥ यासी राज्याची कायसी आरूता ॥ दुष्टबुद्धी कोपला त्वरीता ॥ म्हणतसे काय योलता ॥ हा कवणाचा ऐसे नेणा ॥ ४६ ॥ याउगेची आसीर्वाद आसा देत ॥ पुत्र कवणाचा ऐसें नेणत ॥ धावले भरले राज्याआंत ॥ पढतमूर्ख हो ॥ ४७ ॥ परी चिंता मनी नुपजली प्रधानाचे ॥ म्हणे आशीर्वाद माहानुभावाचे ॥ लटीकें नव्हती तपोनीधीचे ॥ काय प्रतीकारु करूं आतां ॥ ४८ ॥ म्हणउनी जीव हत्यार चांडाळ ॥ ते प्रत्यक्ष बोलाविले सकळ ॥ त्यासी नीरोप दीधला तत्काळ ॥ यासी वना नेउन वधावे ॥ ४९ ॥ वाम चरणीची साहवी आंगोळी ॥ खुण आणावी मजजवळी ॥ इतुकें करारें तत्काळीं ॥ महद्रव्य देईन तुम्हां ॥ ५० ॥ वीर्दीं खेळतां त्या लेकुरां ॥ चालवुनि न्यावें वनांतरा ॥ गिरीगंहरा कंदरादरा ॥ तेथें वधु करावा ॥ ५१ ॥ ते वेळीं प्रधानाचेनि योले ॥ चांडाळ नगरांत प्रवेशले ॥ त्या बालकाते गीवसिले ॥ वना न्यावया ॥ ५२ ॥ ते चालविलें यहुतापरी ॥ आणिले नगराबाहेरी ॥ घेउनि धाले वनांतरी ॥ तया याळकातें ॥ ५३ ॥ मार्गि जातां तया याळ ॥ कष्ट होताति अति प्रवळ ॥ अत्यंत वन भयानक दुरळ ॥ तयामध्यें प्रवेशले ॥ ५४ ॥ नेउनी पर्वताच्या दरा ॥ उभे केले तया लेकुरा ॥ म्हणनी प्रधानकार्य करा ॥ सीघ्र वधावें यासी ॥ ५५ ॥ काढिले खड्ग पुसिलिया धारा ॥ म्हणनी स्मर रे लेंकुरा ॥ तुझे कुलदेव साचारा ॥ असेल ते ॥ ५६ ॥ येरू मुखी घालुनि शिला ॥ हास्य करुनि योलिला तये वेळा ॥ नाम प्रबंध आदरिलें लीला ॥ कृष्ण गोविंद माधवा ॥ ५७ ॥ अहोजी पुरपोत्तमा ॥ उदारा मेघश्यामा ॥ नारायणा परमधामा ॥ त्रिविक्रमा श्रीविष्णु ॥ ५८ ॥ दीनानाथ समुद्धरणा ॥ लक्ष्मीविलासा पुंडरीकनयना ॥ नारसिंहा सिंहवदना ॥ कृपालुवा ॥ ५९ ॥ हरी केशवा गोविंदा ॥ जयजयजी परमानंदा ॥ करुणानिधी मुकुन्दा ॥ पद्मनाभा मुरारी ॥ ६० ॥ माधवा वीश्वकंदा ॥ चरणी जन्मली वसुधा ॥ रमारमणा वेदुवेदा ॥ त्रिविक्रमा मनोहरा ॥ ६१ ॥ मेघश्यामा नारायणा ॥ अच्युता मदसुदना ॥ उपेंद्रा जनार्दना ॥ तुं मुनीजना वीश्रांती ॥ ६२ ॥ पुढती पाहे सीळेकडे ॥ म्हणें ईतुके दीवस पाळिलें कोडें ॥ मी येक अनाथ यापुडें ॥ म्हणउनी गोळ राजा तुजकडे

पाहवसे ॥ ६३ ॥ तुझीया चरणाचीया तुळसी ॥ सील तोची नैव्येद्य तीर्थेसी ॥ तें भोजन परीयेसी ॥ कृपानीधी ॥ ६४ ॥ तव ते चांडाला शस्त्रघात करी ॥ बालकामधा प्रवर्तले तये आवधरीं ॥ तें देखते जाले तयाचें शरीरीं ॥ आश्चीर्यरूप ॥ ६५ ॥ पाहते जाले चंद्रहास्यासी ॥ तव तो दिसे सींह्यवदनेसी ॥ क्षणा दीसे नरवदनेसी ॥ क्षणे दीसे सींह्यवदन ॥ ६६ ॥ भयभीत झालें मानसीं ॥ कृपा उपजली तयासी ॥ मग म्हणती न मारू यासी ॥ मारितां विघ्न आम्हासि ॥ होईल देखा ॥ ६७ ॥ कापूं आंगोली दाउ प्रधानासी ॥ परी न मारूं जीवें बालकासी ॥ मग खंगें तोडूनि आंगोलियेसी ॥ प्रधानापासीं आणिलें देखा ॥ ६८ ॥ मारिले म्हणउनि खूण दिधली ॥ सुडस प्रधानाचे मनिची फीटली ॥ त्याची मनकामना संतोशली ॥ द्रव्यें महा दीधली तयां ॥ ६९ ॥ तुटलिये आंगोलिची वेथा होत ॥ तया बालकासी बहुत ॥ वनांत हिंडतसे अक्रंदत ॥ ते सुकुमार बाळक ॥ ७० ॥ तयाचीं सकुमार पदतलें ॥ रूपनी कांटेवलें ॥ मनी सत्य असे आगळें ॥ निर्धारू सिलेमीं ॥ ७१ ॥ म्हणे तुज सरिसी क्रिडा करीं ॥ तुजचि देखें अभ्यांतरी ॥ तुंचि माझा कैवारी ॥ आतां पां वनात सहाकारी ॥ तुंचि गोकुळ राजा ॥ ७२ ॥ तुज न्हाणी अर्पीन तुळसी ॥ अर्ची जेरवी अत्यंत मनाची ॥ तोचि प्रसाद भोजन मजची ॥ आतां कां करीन तुज वीण ॥ ७३ ॥ रात्र दिवस मुखीं प्रसाद तुझा ॥ आतां काय कुमार देखिला माझा ॥ अस्वासिजे जी गोळक राजा ॥ साहाकारी आकांताचिया ॥ ७४ ॥ म्हणोनि मुखीं घालुनि शिळा ॥ नेत्र केले विन्हळा ॥ वनी हिंदतां त्या बाळा ॥ काय अपूर्व वर्तलें ॥ ७५ ॥ वेगाथिले असीवार ॥ घोडियांचें हिंसीं अंबर ॥ हस्तिचे पाठीवरी गुढर ॥ जैसे कां गिरिवर चालिले ॥ ७६ ॥ हिंस्कार किंकार शब्द तीगट ॥ सहश्र वर्नी सुभट ॥ धडधडा वाजती चक्रवाट ॥ हाफीन ठाकित पांयाचे ॥ ७७ ॥ पांगठोनीं चतुर्दिशवनीं ॥ चिते सुटताती रथानरूनि ॥ स्वानें स्वापदा झोयें धांवोनि ॥ जाळी वागुरा मांडिती ॥ ७८ ॥ पोतीं वोडविती झाडोंझाडीं ॥ पाडिती हरणाचिया मुरकुंडी ॥ वीरीं भुजा दंडी प्रचंडी ॥ रान झाडिलें पारधीये ॥ ७९ ॥ सरें सावजे अडकती पोतां ॥ येक स्वापदें वागुरेसीं पडतां ॥ हांक देउनि गजतां ॥ हुंकार हुं हुं म्हणताती ॥ ८० ॥ ससाणे सोडिताती गगनी ॥ सधानें साधिताती धांवोनि ॥ ऐसें राण झाडिलें पांगठोनी ॥ शुकर किंकाटती ॥ ८१ ॥ पाडिती हरणाचिया मुरकुंडी ॥ जिव्हा काढोनि बांधिती बिंडी ॥ वीरी दो पिंडी प्रचंडी ॥ राण झाडिलें पारधी ॥ ८२ ॥ तव कलिंग देशिचा भुपती ॥ स्वधर्मीक महाख्याति ॥ राजा कलिंग तया वनाप्रतीं ॥ येता झाला ॥ ८३ ॥ घोडेस्वार धांवती वनीं ॥ टाकिती स्वापदें धांवोनि ॥ तंव येकसरें देखिलें नयनीं ॥ ते बाळक वनामध्यें ॥ ८४ ॥ मग उतरोन रथाखालता ॥ कलिंग झाला पुढारा येता ॥ पुसतसे तुं कवणाचा रे सुता ॥ कां हिंडतोसि घनें दारूणें ॥ ८५ ॥ राजसा सुकुमार वेल्हाळा ॥ अजानबाहो विशाळा । भुजा दंड सरळा ॥ राजपुत्रा लक्षणोक्त ॥ ८६ ॥ कां पां

हिंडसी वनें हुरळे ॥ म्हणउनि उदकें सिंपिले डोळे ॥ पुढती अंतःकर्ण खळवळे ॥ उचलोनि आलिंगिला ॥ ८७ ॥ जपतसे नामावळि हरीची ॥ मुद्री दिला शाळग्रामाची ॥ सहस्रनामें गोविंदाची ॥ स्तुती करितसे ॥ ८८ ॥ विस्मीत जाला कळिंदु ॥ बाळकासि कायसा छंदु ॥ जपतसे नामप्रबंधु ॥ सहस्र नामें श्रीहरीची ॥ ८९ ॥ ससमसाहसा कळिंदेशु ॥ पुढें घेतला चंद्रहास्यु ॥ म्हणे जन्म सार्थक परम संतोशु ॥ मना उल्हास वाढतसे ॥ ९० ॥ मातापिता मैथुन वळें ॥ शोणित शुक्लित खेळें मेळें ॥ होय निर्माण सुरतवेळें ॥ त्यातें पुत्र ऐसें म्हणती ॥ ९१ ॥ परि ये वनीं अकस्मात ॥ अपत्य झालें मज प्राप्त ॥ रायराजकुमार अनुन्यात ॥ ग्रामाप्रति निघाले ॥९२॥ मंत्री प्रधान अधीकारी ॥ आले नगराबाहेरी ॥ रायें नीरोप दीधलें तयें आवसरी ॥ मखरें उभवीली ॥ ९३ ॥ तोरणें स्वस्तीकें धुपीळीया वीदी ॥ ठाईं ठाईं राजवीदी ॥ स्त्रीयाजन पाहाती आनंदी ॥ तया बालकासी ॥ ९४ ॥ प्रवेशला रावुळांगणाभीतरीं ॥ पुढें चामरकरी माझारी ॥ येउनी कळिंद्राची प्राणेश्वरी ॥ वोवाली तया पुत्रातें ॥ ९५ ॥ रायें वीडे दीधले सकळीका ॥ म्हणें आजी लाभ आम्हासी जाला नीका ॥ पावलों सुपुत्र बालका ॥ सलक्षणीक लक्षणयुक्त ॥ ९६ ॥ हरणें मृगें चीतळें ॥ हिंडतां प्रत्यही पारधी मीळे ॥ तेणें प्रत्ययायु अगळें ॥ परी न नीवती डोळे तया पाहतां ॥ ९७ ॥ वीडे समस्तांसी दीधले ॥ थोर कालींद्रासी सुख जालें ॥ म्हणे आजी जन्म सार्थक फळलें ॥ ऐसा पुत्र माही जाला ॥ ९८ ॥ द्विजा जाली भोजनवीधी ॥ शडरस पक्वानुशुधी ॥ येर गर्जत आशीर्वादी ॥ मंत्र वैदीक वेदश्रुती ॥ ९९ ॥ जोतीसी आस्टाधीकारी ॥ म्हणती गा कळींद्रा आवधारीं ॥ इक्षित चंद्रहास्य वदनीं हाकारी ॥ म्हणउनि अवधारी चंद्रहास्य नांव ॥ १०० ॥ यासी राज्याचा अधिकारू ॥ हा तुं मानि पां निर्धारू ॥ संतोषला नृपवरु ॥ द्विजां वस्त्रें दीधलीं ॥ १ ॥ सुखी झाले रायाचें अंतःकरण ॥ येथुन फीटलें अपुत्रपण ॥ अल्हादे सकळहीं जन ॥ चंद्रहासाचेनि पुत्रत्वें ॥ २ ॥ राज्यासी अधिकारी चंद्रहास्य येक ॥ तयासी दर्शना येती प्रत्यहिं लोक ॥ सर्वजनासी परम संतोश ॥ राज्य आकळ वळकावलें ॥ ३ ॥ दीधली चंद्रहास्यासी राणीव ॥ आवघे नगर मदैव ॥ नाहीं जरा मृत्यु अदैव ॥ थोर वांटीव पुरुषार्थाची ॥ ४ ॥ मेघ वरूषे यथाकाळीं ॥ वृक्ष फळती सदां काळीं ॥ मृत्यु रोगादी सकळीं ॥ गीरीकंदरें निळंबीली ॥ ५ ॥ गाई बहुत क्षीर प्रसवती ॥ शास्त्रे वेदाध्येने चालिती ॥ द्वीजाघरीं सर्व नीश्चीती ॥ रायें चंद्रहास्यें केली ॥ ६ ॥ दीशा दीसताती सोज्वळा ॥ मनोरमा अती नीमळा ॥ येशप्यत्ती आली फळा ॥ चंद्राहास्येचेनी पुत्रपणें ॥ ७ ॥ साहवें वरूप नीघालीयावरी ॥ कालींद्रराजा चींता करी ॥ आतां पढों घालों द्वीजांघरीं ॥ नीकीयापरी आवधारा ॥ ८ ॥ करावें आक्षरज्ञान ठाउकें ॥ म्हणउन मुहुर्त पाहिलें नेटकें ॥ पुत्रासी आणुन नीकें ॥ पंडीतीं धडा घातला ॥ ९ ॥ चंद्रहास्यें वीनवीलें तें येळीं ॥ राउळें जे लीहीले सकळीं ॥ पाटु भरा पाईं ये वेळीं ॥ काये धडा आसे

तुमचा ॥ १० ॥ येर म्हणती हा वोनामा ॥ बरवा पढे गुणग्रामा ॥ म्हणे परीसा जी उत्तमा ॥ आणीक कायें धडा तो लिहिजे ॥ ११ ॥ दुसरी लीहीली येकाक्षरी ॥ तव चंद्र म्हणे जी भारधारी ॥ आतां वाचुन धा पां खरी ॥ रव आक्षरे नामें आवधी ॥ १२ ॥ पहीलें वोनाम्यातें वाचीलें ॥ येरें नींवांत परीसीले ॥ री री ऐसें याचें आक्षर आलें ॥ मग थोट टेचीलें तयावरी ॥ १३ ॥ येर पुसा म्हणतसे ॥ पंडीत म्हणती कायसे पीसे ॥ सदसदा येतसे हांसे ॥ तंव चंद्रहासे बोलीले ॥ १४ ॥ जी मासें थीनवीलें परीसावें ॥ पुढील वाचा म्हणनील आवचे ॥ जरी येईल आधवें ॥ तरी मज आज्ञा दीजे ॥ १५ ॥ तेवेळे वाचीली येकाखरी ॥ हकार सांपडला तये आवश्यरी ॥ आंगोळी टेचिली तयावरी ॥ येरे सोडा म्हणउनी पुसीलें ॥ १६ ॥ वोनामा येकाक्षरी पुसीली ॥ हकार रीकार दोनी आक्षरे राखीली ॥ तेही पाटीवरी लीहीली ॥ मग वाचीनीली पंडीताकरवीं ॥ १७ ॥ आधीं लिहीला हकारू ॥ पाठीं लीहीला रीकारू ॥ वाचुनीया हा मंत्र थोरू ॥ हरी हें घडेल नीर्धारें ॥ १८ ॥ मग वीनवीलें पंडीतोत्तमा ॥ म्हणे येणे काये कारण आम्हा ॥ येक हरी परमात्मा आम्हा ॥ हेची लीहीली ॥ १९ ॥ येरे रागीजोनी कांची हाणीतलें सुता ॥ म्हणे हरी आक्षरें कायसीं भ्रांता ॥ जी तोची दाता ॥ हरीवीण काय तें सांगीजे ॥ २० ॥ पन्नास वर्ण हे वीरणे ॥ हरी सामर्थ्यें जाणा खुण ॥ सीधो वर्ण संमान्य संपूर्ण ॥ मज गुरूनें आणवलें नीरूतें ॥ २१ ॥ रागेजोनी आणीला कार्ळीद्रापासी ॥ समग्र वृत्तांत नीरोपिला त्यासी ॥ जपतसे अहिर्णीसी ॥

हरी हरी हीं दोनी अक्षरें ॥ २२ ॥ ते वेळें पुसतसे कार्ळीद्रु ॥ म्हणे तुज लाविला कवणें छंदु ॥ येरू म्हणे मिथ्या सर्ववेवादु ॥ हरी हीं अक्षरें दोनीच ॥ २३ ॥ पंडित म्हणतानी मज नेणनें ॥ आवघेची विचारू मज नेणतां पां येथें ॥ काय आसे हरी-परतें ॥ ने मजपुढे नीरूतें सांग पां ॥ २४ ॥ तंव तो कार्ळीद्र म्हणे पंडिता ॥ आतां न मारा न पढवारे सुता ॥ हा मूर्ख होउनी आसो परता ॥ कुळासी येश कीर्ति या जेनी ॥ २५ ॥ सातवें वरूप प्राप्त जालें ॥ रायें मुंजीबंधन आरंभिलें ॥ बरवे मोहस्थाव केलें ॥ संतोषविलें द्वीजवरू ॥ २६ ॥ पाठीं वेदी* वेदीक्या जेथें घातला ॥ वरवीया श्रद्धा भक्ती पढों लागला ॥ सर्व शास्त्रें पढीनला ॥ मग संतोपला कार्ळीद्र ॥ २७ ॥ म्हणे याचेनी वरवेपणें ॥ जाले वौंशीं पारणें ॥ हृदयी आलिंगुनी म्हणे ॥ आमचे जन्म सार्थक ॥ २८ ॥ उमें कर्वती देह फोडीलें ॥ कीं हिम केदारीं साधीलें ॥ कीं पंचाग्नी साधन साधिलें ॥ कीं संतोपवीले लक्ष्मीपती ॥ २९ ॥ म्हणउनी पावलों पां पुत्रासी ॥ पूरी आठ वरूषें भरली त्यासी ॥ वेदु पढीनला अनायासी ॥ सर्व शास्त्रें आभ्यासीली ॥ ३० ॥ कीं सुखीं केली द्वीजवृंदें ॥ तीर्थे सेविले उपशुधें ॥ सप्त पुरीया भाव सीधें ॥ दानें दानें घडली ॥ ३१ ॥ बरवी सामवेदाध्यानें ॥ वरी श्रीहरीनाम-

* 'वेदाभ्यास करविला' असाहि पाठ आढळतो.

चींतनें ॥ राज्यस्थिती चालवणें ॥ चंद्रहासें कीजे तसे ॥ ३२ ॥ आभ्यासुनीया विद्या ॥ अवघें पां पढणें सर्व विद्या ॥ चंद्रहासामारिखा सुधीचा ॥ आणीक नाहीं दुसरा ॥ ३३ ॥ आत्माराम नीश्चीतु ॥ म्हणउनी धनुष्यबाण करीं घेतु ॥ लक्ष मेदुनी भेदींतु ॥ बाप आचुकाई तु धनुर्वीडा ॥ ३४ ॥ मेंदे भेदीतां जनार्दनी ॥ लक्षी भेदीजे हे जाणोनी ॥ ठाण त्रीभंगी मांडुनी ॥ तो संव्हारी व्यापकु ॥ ३५ ॥ शरीर धनुष्य कठीण ॥ पंचभूतें इंद्रिय प्राण ॥ सीत धनुष्याचें नीर्वाण ॥ करी संधान चंद्रहास्य ॥ ३६ ॥ ऐसें करुनी गुरुसी नमन ॥ नीश्चये चैतन्य दृढमन ॥ कामक्रोधादीका लोचन ॥ निर्मठर नीर्वैर ॥ ३७ ॥ नारद म्हणे रे आर्जुना ॥ शालीग्राम पुजार्चना ॥ रात्रींदिवस हरीचिंतना- ॥ वाचुन नेणे तें बाळ ॥ ३८ ॥ राणीव आली आपला हाता ॥ लोकामीं स्वाधीन केलें स्वता ॥ आज्ञा केलीया महंता ॥ चंद्रहासें सकळीकांसी ॥ ३९ ॥ तुळसीसहित वृंदावने ॥ जयाचा घरी नाहीं चीन्हें ॥ ते म्या सर्वथा दंडणें ॥ ऐसा डांगोरा पीटीला ॥ ४० ॥ व्रत जो न करी एकादसी ॥ ते दंडणें आम्हांसी ॥ हरीकीर्तन आहीणोसीं ॥ जो न करिती स्वगृहीं ॥ ४१ ॥ आपुलाला घरोघरी ॥ अनीत पुजन नीरंतरी ॥ पंचपर्वें उपायावरीं ॥ स्नान दानें करीताती ॥ ४२ ॥ हवन पुजन रुद्रस्थानें ॥ जेन करीती आसनी ध्यानें ॥ मठ मडप पोहेदानें ॥ जेन पुरवीनी विषम मार्गी ॥ ४३ ॥ वापी कूप तडागें मार्गी ॥ चंद्रहास्यें केली वेगीं ॥ ठाणें घातलीं दुर्गोदुर्गी ॥ राज्य यळकट पैं केलें ॥ ४४ ॥ ऐसे अवघे नारदें बोलिलें ॥ परीसोनी अर्जुनें वीणवीलें ॥ चंद्रहास्यें अभ्यासीलें ॥ बहुता जन्माची सामोग्री ॥ ४५ ॥ ऐसा मीं कैं होईन भक्तु ॥ श्री हरीचरणीं रतु ॥ दर्शनें स्पर्शले हा संगतु ॥ ऐसा कवण मज करील ॥ ४६ ॥ तव बोलिला ब्रह्मसुतु ॥ पार्था ऐक भक्तांची मातु ॥ बळी पाताळि वैष्णव महंतु ॥ लंकापुरी बीभीषणु ॥ ४७ ॥ सत्यलोकीं चतुर्मुख ॥ विष्णुभक्त हे आईक ॥ परि याचें सामर्थ आलोलिक ॥ नाहीं भक्त देखिला ॥ ४८ ॥ परी इतुकेंचि वंचले ॥ येवढें निधान नाहि साधिलें ॥ परिसतां मन सुखी जालें ॥ तो अनुवाद न करवें ॥ ४९ ॥ आणीक याची कथा नीरंतर ॥ पार्थ परिसावी सविस्तर ॥ सोळावा वरूषीं तो सुंदर ॥ काय करिता जाला ॥ ५० ॥ तव नारदु म्हणे कवणे येके वेळी ॥ बरवा सुदिन काळीं ॥ चंद्रहास्य विनवी तें वेळीं ॥ कळींद्रा रायासीं ॥ ५१ ॥ आज्ञा दिजे जी भूपाळा ॥ द्विग्विजयो यज्ञ येथळ ॥ महता प्रबंध बोलियेला ॥ राज्य या नीर्मळ असो ॥ ५२ ॥ याचे फळ आसे बहुसाल ॥ जींकावे जी पृथ्वी मंडळ ॥ जरी आज्ञा मज देसील ॥ तरी यज्ञ आरंभु ॥ ५३ ॥ तयासी कैंचे याटेल सुख ॥ धर्म करणें हें तयासी दुख ॥ इतुकें कैंचे आमुचें कटक ॥ पृथ्वी जींकावयापुरतें ॥ ५४ ॥ तव चंद्रहास्य रागेला ॥ पांच रथेसीं आरूढला ॥ पित्रु आज्ञा घेउनी नीघाला ॥ राये पृथ्वीचें जींकावया ॥ ५५ ॥ हे परीसोनी भूपती ॥ देशोदेशीचे हांसती ॥ कटक सामग्री आली म्हणनी ॥ काय वर्णु तयाची ॥ ५६ ॥

जी ही भक्ती आराधीला हरी ॥ कैसे नीधावें पायावरी ॥ चंद्रहास्य मनी वीचारी ॥ ह्रदई करी नीर्धारु ॥ ५७ ॥ नाहीं भक्ती आराधीला हरी ॥ पृथ्वीच्या राजेश्वरीं ॥ राज्य करी कवणेपरी ॥ भक्तीहीण म्हणउनी ॥ ५८ ॥ बहुरथ गनी आळोलीक ॥ आकाश पाताळ सकळिक ॥ जळस्थळ व्योम मंडळीक ॥ आर्धा नीमीशें ढांडोळीले ॥ ५९ ॥ वायु पुरुषार्थ समग्र क्षीती ॥ जींकीले पृथ्वीचे चक्रवर्ती ॥ युध्य करी ते म्हणनी ॥ शक्ती आलोलीक म्हणनी ॥ ६० ॥ राज्य जींकीले ब्रीद आगळें ॥ आक्रम शक्ती जींकीती कलीकाळें ॥ तें नीमीस्यानीमीस्य मीळे ॥ तव जींकीले चंद्रहास्यें ॥ ६१ ॥ ऐसी छपंन कोटी वसुंदरा ॥ दीपोदीपीच्या राजेश्वरा ॥ जींकीता कळींद्राचीया कुमरा ॥ वेळ नळगे परियेसा ॥ ६२ ॥ ऐसा आकरावा दीवसीं ॥ आला चंद्रहास्य चंद्रावतीसी ॥ जिकोनी पृथ्वीचीया भूपाळांसी ॥ रत्नें सुवर्णे आणविली ॥ ६३ ॥ रायाचें शत सहस्र ॥ हस्ती गुढारें आपार ॥ नाना जातीचे अश्व मनोहर ॥ समस्त सामग्री आणविली ॥ ६४ ॥ बाहिर काळींद्र भेटों आला ॥ तेणें चंद्रहास्य आळंगिला ॥ तेवेळीं सुपुत्र बोलिला ॥ तया कळींद्राप्रती ॥ ६५ ॥ हे राजे पृथ्वीचे थोर थोर ॥ जे कां काळासमान महावीर ॥ आम्हीं जिंकोनी आणिले नगरा ॥ आळींगणें दीजे यासी ॥ ६६ ॥ ते वेळें आळगिलें समस्त ॥ रायासी केलें गंधाक्षता ॥ बीढारासीं पाठविले समस्त ॥ राजो उगाणी जाली बरवी ॥ ६७ ॥ यज्ञकृत्य सारिले भूपती ॥ सामग्री वेचिली बहुते रीतीं ॥ मग समग्र राजे पाठविजेनी ॥ आभार करूनी आहेर ॥ ६८ ॥ ऐसें बहुता एका दीवसां ॥ काळींद्र म्हणे चंद्रहास्या ॥ आम्हीं करूभार प्रतीवरूदा ॥ राया कुळी दासी देतसे ॥ ६९ ॥ तरी प्रत्यसगें हे द्रव्य उरलें आसे ॥ देउनी पाठवावे प्रधानासरिसें ॥ तव बोलिलें चंद्रहास्यें ॥ हे देणें कायसें तयासी ॥ ७० ॥ राजे जींकीले पृथ्वीचे ॥ तयाहुनी बळ काय तयाचें ॥ कळींद्र म्हणे कार्य नव्हे सेवकाचें ॥ स्वामीद्रोही न व्हावें ॥ ७१ ॥ म्हणउनी कीतेक सामग्रीसीं ॥ पाठवीले प्रधानासी ॥ तेवेळीं संतोष झाला मनासीं ॥ कुंतली रायाचीया ॥ ७२ ॥ तेहीं आणुनी दीधलें ॥ तव प्रधान सतोपले ॥ त्याचें लोक आस्वासिले ॥ तें द्रव्य घेतलें भांडारीं ॥ ७३ ॥ मग नीरोप दीधला प्रधाना ॥ यास घालावें उदक आन्न ॥ घेउनी गेला घरासी जाण ॥ घरी पुजीले ते लोक ॥ ७४ ॥ दुष्टबुद्धी उठ्री भोजना ॥ तैं येकादशी सकळै जना ॥ तेथें काय वर्तलें तें जाणा ॥ तें पाटक नामा सांगेल ॥ ७५ ॥

## चंद्रहास्य कथा ( २ )

श्रीसद्गुरुचिन्मयानंदाय नमः ॥

मग आन्न नीपजविली बहुवसें ॥ पाकनीसपती केळी शडरसें ॥ कळींद्राचीया लोकासीं कैसें ॥ पाहुणेरू मांडीला ॥ १ ॥ सारूनी स्नान देवतार्चन ॥ बाढीली नाना

प्रकारीचे भाज ॥ तेवेळीं बोलिला प्रधान ॥ म्हणे आतां उठीजे आरोगणां ॥ २ ॥ येरू म्हणे परीसा विनंती ॥ आम्हासी चंद्रहास्याची आज्ञा बहुती ॥ जो मोडील एकादशी ये क्षितीं ॥ तो आम्हां दंडणे सर्वथा ॥ ३ ॥ ऐसी आज्ञा केली सर्व लोकां ॥ जो एकादशी मोडिल ऐका ॥ तो दंडणे नीमीन्यांयेका ॥ ऐसे सर्व लोकांसीं म्हणतीलें ॥ ४ ॥ ते दीवसीं होउनी सर्वा श्रीकारीली ॥ व्रत नाहीं एकादशी मोडीली ॥ तैसीच आवृती पडीली ॥ समस्तां लोकांसी ॥ ५ ॥ पाहतां पर्त्रीकेचेनी मीसें ॥ विघ्न रचीले आनारीसें ॥ राज्य पावीजेल चंद्रहास्यें ॥ कुंतलापुरीचे परीएमा ॥ ६ ॥ प्रधान संभ्रमें नीघाले ॥ तुम्ही स्वभावतां वीजें केलें ॥ आमचेनी राजे म्हणीतले ॥ म्हणउन मांडिले भोजन तुम्हां ॥ ७ ॥ तरी अजीचा दिवस कृपा कीजे ॥ नावेक व्रतास मान दीजे ॥ पाठी वृत्त अनुस्टीजे ॥ जें धासेल तुमचे ॥ ८ ॥ तव येरू म्हणे दीजे आवधान ॥ आजी आम्हा सर्वथा उपोशण ॥ व्रत मोडीलीया होईल जाण ॥ दोन्हीं मध्यें एकहिं न घडे ॥ ९ ॥ यह लोक ना परलोक ॥ चंद्रहास्य ना श्रीहरी एक ॥ आणीक परीसा वीदोष ॥ व्रतासी वर्जन करावें ॥ १० ॥ तव राऊळ तव जाणतसे ॥ आम्हा मोडणे नाहीं सर्वथा परीयेसें ॥ तेवेळीं बोलिलें वीदोष ॥ दुष्टबुद्धी प्रधान ॥ ११ ॥ तुम्ही बोलिला जो वीदोषु ॥ ना श्रीहरि ना चंद्रहास्यु ॥ सर्वथा करीन तयाचा द्वेषु ॥ धरूनी आणीन चंद्रहास्यातें ॥ १२ ॥ तुम्हा जरी कोपेल चंद्रहास्यु ॥ तरी मी करीन चंद्रहास्याचा नाशु ॥ आमचे म्हणीतलें न करावा नाश ॥ येरू बोलते जाले ॥ १३ ॥ आकरावें दीवसीं छप्पन्न कोडी ॥ तेणें पृथ्वी जींकोनी प्रौढी ॥ तयासी वीरूध कराल तुम्हीं केवढी ॥ हे बुधी कुडी वीचारणें ॥ १४ ॥ आम्हांसीं तंव आजी घेणें नाहीं थान ॥ तुम्हीं सर्वथा न बोलावें आन ॥ तेवेळीं रागेला प्रधान ॥ म्हणें करावा लागेल द्वेषु ॥ १५ ॥ म्हणऊन घोडां बैसला ॥ मग रायापासीं आला ॥ तेथें सांगो लागला ॥ कळींद्राची स्थिती ॥ १६ ॥ मग तया कळींद्राप्रती ॥ करूं आदरीली वीनती ॥ म्हणें तूं पृथ्वीचा भूपती ॥ कळींद्र सेवक तुझा जाण राया ॥ १७ ॥ तुम्हामीं वृधाप्य सोपें पाहीं ॥ आम्ही ईतुकी आसताची नाहीं ॥ प्रतिकारू करावा लागेल कांहीं ॥ तेथें जाणें आम्हासी ॥ १८ ॥ राजाज्ञा घेउनी नीघाला ॥ बहुत दलेंमी परीवारला ॥ पुत्र मदन कुशल भला ॥ तयासी नीरोपीला राजभारू ॥ १९ ॥ कुळींद्र म्हणें दुष्टबुधीतें ॥ तुम्ही जाउनी तेथें ॥ वरू आणावें चंपकमालतीतें ॥ हे सगुण सुंदर स्वरूप ॥ २० ॥ प्रधान आला आपुलीया मंदीरा ॥ मार्जन जालें तया अवसरा ॥ तें देखें बोली सुकुमारा ॥ वीशया कुमरी ॥ २१ ॥ बोलीली वीशयाकुमरी ॥ बापा येक वीनंती अवधारी ॥ वृक्षें सींचन कीजे जरी ॥ वृधाचारू ऐसा असे ॥ २२ ॥ तरी संचुनी वाढली असे रोप ॥ तयाचें उद्यापण करावें बापा ॥ येरू म्हणें नीरोपु सोपा ॥ मी येउनी करी ॥ २३ ॥ जाणीतलें प्रधानें मनीं ॥ कुमारी तव जाली शाहाणी ॥ उपजलीया दीवसापासुनी ॥ वरूपें सोळा भरली ॥ २४ ॥ आम्हा पाहाता

नाही राहीलें ॥ वेळा दोनी त्रिभुवन धांडीळीलें ॥ ईश्वरासी देखो म्हणीतलें ॥ तरी मनुपें भोगणें नाहीं तयासी ॥ २५ ॥ घरीं सोईरा नाही तयासी ॥ मग संधी नीघे ते वनेसी ॥ बापु नाठवे त्याचा त्यासी ॥ परियेसा ॥ २६ ॥ बहुता दीसाचा म्हणसी ॥ जन्मुनी सर्पांची संगती ॥ अग्नी भाळीं आणीक स्थीती ॥ गजे चेर्मे वेढीली ॥ २७ ॥ भस्म उधळण करी सदा धुरजेठी ॥ आमची वीशया चापें गोरटी ॥ आतां वीचारू जगजेठी ॥ वीष्णु वरू ईयेजोगा ॥ २८ ॥ तोहीं बहुचक बहुनायेकु ॥ तयासी म्हणती व्यापकु ॥ त्यासीहीं मोईरा तोची येकु ॥ नाही दुसरा तयाऐसा ॥ २९ ॥ आतांच तुं मूर्खे म्हणो विधी ॥ रात्री दीवस तयासी उपाधी ॥ आचारें श्रष्टी रचीता वीवीधी ॥ कुमरी वराची धणी आसेचीना ॥ ३० ॥ ईंद्र वीचारीता नोवरा ॥ तो बहुता डोळयाचा आवधारा ॥ वीशया वरपडा सुंदरा ॥ आतां करणां पां वीचारू ॥ ३१ ॥ आष्ट लोकपाळ म्हणे जरी ॥ तयासी लक्षने आवधारी ॥ चंद्रसूर्य म्हणो जरी ॥ त्यासी रात्री दीवस आरणुक नाहीं ॥ ३२ ॥ सत्य लोक वीचारीता ॥ नाहीं ईची स्वरूपता ॥ पाताळीं धांडोळीतां ॥ फडे आसती मायां सर्पांचीया ॥ ३३ ॥ हे जाली अवर अनी-पाडें ॥ गांवां नीघतां घातलें कोडें ॥ आतां ईजोगा वरू जोडे ॥ ऐसी काये बुधी करू ॥ ३४ ॥ तेचेळीं आस्वासीलें प्रधानें ॥ आलीयावरी करू वतें उद्यापने ॥ नीघे उतावेळ मनें ॥ चंद्रनावनी टाकीली ॥ ३५ ॥ तव कळींद्र समस्ता प्रधानासी ॥ येउनी भेटला धृष्टबुधीसी ॥ बीढारा नेला तयासी ॥ संजोगणी पैं जाली ॥ ३६ ॥ तव प्रधानामनीं आणीक भावो ॥ म्हणें पुत्र पां तुमचा पाहो ॥ जेणें जींतीले राय रावो ॥ छपन कोटी वसुंदरा ॥३७॥ ते वेळीं चंद्रहास्य बोलावीला ॥ तो दुष्टबुधीसी भेटवीला ॥ नमस्कार करूनी उभा केला ॥ मग लागला आवलोकु ॥ ३८ ॥ आपादमस्तकवरी पाहिलें ॥ आवघें शरीर आवलोकिलें ॥ तव वामचरणींचें देखिलें ॥ चीन्ह साहव्या आंगोळीचें ॥ ३९ ॥ मग म्हणें हा तोची काळु ॥ वैरी जाळासे प्रबळु ॥ आतां कां पा न लाउ वेळु ॥ म्हणुन मानसीं वीचारीलें ॥ ४० ॥ युक्तीनें बोलतसे ॥ म्हणे तुम्हा गमतसें कैसें ॥ आच्छादीतां वीधान ऐसे ॥ रायासी कां पां न भेटावें ॥ ४१ ॥ बहुयेक राज्य देतां ॥ आजी पृथ्वीपती आसतां ॥ आणीक परीसा कथा ॥ ग्रहवेवस्था आमची ॥ ४२ ॥ आतां हे पत्र आमचें न्यावें ॥ वरव्यापरी नीरोपावें ॥ कवणा न सांगावें ॥ आणीकासी ॥ ४३ ॥ हे दुसरीयासी देवों नये ॥ आतां पत्रीका न्यावी ऐसेनी उपायें ॥ ऐसे म्हणउनी लीहीलें कुबुद्धीप्रायें ॥ ते कारण परियेसा ॥ ४४ ॥ स्वस्ती श्रीरस्तु मदना ॥ दुष्टबुद्धी लेखणा ॥ पाठवीले येकांत स्थाना ॥ वीचारूनी वाचावें ॥ ४५ ॥ चंद्रहास्य तुज हितु ॥ म्हणउनी मंत्र अनुष्टीतु ॥ जरी होसील माझा सुतु ॥ तरी वीळंबु न लावीजे ॥ ४६ ॥ सर्व संपत्तीया आधीकारू ऐसा जो वीचारू ॥ त्या लीहीला आसे नीर्धारू ॥ म्हणउनी मंत्र अनुष्टीजे ॥ ४७ ॥ वीश या दीजे प्रयत्नें ॥ कुळान्वय म्हणाल क्षने ॥ वय रूप न पाहणें ॥ क्षण न

तळा ॥ २६६ ॥ चौदा भुवनें धरीली : ब्रम्हयाचे नामीकमळी : भुवणे होती ती कमळमली : ती देने कैसें ॥ २६७ ॥ तु प्रसन जाहालासी : यीचारी पां मनासी : करन बुधी (ऐसी :) कैसीं होयें ॥ २६८ ॥ म्हने देवांगु सारंगधरा : मी म्हनन ते जगधारा : देठ तोडोनीया सरळधारा : सुत्र काढावें ॥२६९॥ बुधी मानली नारायेना: यहुत सोतकळा मना : माझे सुत्र तुझी रचना : नाव कोणाचे होईल ॥ २७० ॥ मग म्हने गा श्रीहरी : दोघांचे नांव स्वयंकारी : सब्द उमटेल सचराचारी : देवांगसुत्र म्हणोनीया ॥ २७१ ॥ हरीने करी सस्त्र घेउनीं चीरीला देठु : मधील सुत्र काढुनी धंदु : दीधले देवांगु जाहाला संतुस्ट : हरीसे नीर्भरू ॥ २७२ ॥ दोघांचे नाव अले देवा : परीधान होईल सर्वा : वस्त्र नाव वसुदेवा : ऐसे म्हणोनीयां ॥ २७३ ॥ हातीं घातलें सुत्र : नारायेनु पाठनी स्वरीतु : मग काये वीनवीतु : देवांगु ॥ २७४ ॥ आतां मी जाओ कैसा : अड दैत्ये नीघेळ कैसा : म्हनउनी वीनवी तुसे कैसा : नारायेना ॥ २७५ ॥ मग करु मस्तकीं ठेवीला : तो भीना कळींकाळा : मणौनी संचरला: सक्तीबले भांतकरली ॥ २७६ ॥ सुदसेन दीधलें : देवांगा फुराग अले : सक्तीबळ दुनाउले : मग सास्टांगें नमस्कारीलें ॥ २७७ ॥ मग नीघाला तेथुनी : क्षीरसागरा बाहीरी येउनी : क्षनु येकु संतु होउनी : नीघता जाहाला झडकरी ॥ २७८ ॥ मधीं गगनगंगा मंदारीं : आम्रुतजळ पुर्नपानी : स्नान कराया म्हनौनी : बैसला टटाकीं ॥ २७९ ॥ चक्र सुत्र ठेउनी : मग स्नान करुनी : नीघाला तेथुनी : झडकरी : अंतराळीं होता नीसाचर : म्हावळ भयंकर : देपीयेलें सुलधार : म्हननी हा जातो रे कवण ॥ २८० ॥ आतां येथुनी देवासुरा यौध्य : पुरानांमाजीं प्रसीध : तया ध्यावे सनीध : चीत देउनी ॥ २८१ ॥ इती ब्रम्हकुने ब्रम्हांड पुराणें : सुत्र नीर्मांण : सुभ भवंतु : अवस्वरु पहीला ॥ १ ॥ छ ॥

(ओव्या २८६–३३९)

देवांगाचे देखीले दानवि : हा जातो रे कवन धीरु धानी : धांवा रे अटवीं : चक्र सुत्र हीरोनी आना ॥ २८६ ॥ उभे होते परीवार : ते धायीनले आपार : सांडीं सांडी रे हतीयार : नाहीं तरी मुकलासी ॥ २८७ ॥ देवांगु नेटु धरीं : मग त्यानें पाचारी : तुम्ही कवनाच रें परीवारी : म्हणौनी सब्दें पाटी ॥ २८८ ॥ म्हनती जाणसी हळद्रामोलगासुरू : त्याचा परीवारु : नळासुरा बहु सत्वापारु : डवळा गीरी पीवळासुरु : ॥ २८९ ॥ देवांगु म्हने जारे जारे रापीलेनी : सांगा तुमचीया स्वाम्याप्रती : तव उडावले सांगों कीर्ती : अगनीत नीसांचर ॥ २९० ॥ क्षेतु न लगतां नीदौळीले देवांगे : मग धांवतानी पळताती वेगें : म्हनताती हा नव्हें रे मसुरेगें : सांगती स्वाम्याप्रती ॥ २९१ ॥ बहुत सतोसला मोलगासुरु : पाहा पाहा रें याचा सत्वापारु : अम्हीं बहुत तो येकला वीरु : होईल हरीचा अवतारु ॥ २९२ ॥ तवं बोलिला नीळासुरु : जाहाला हरीचा अवतारु : मि भीडेन, येकला वीरु :

म्हणौनी गर्जेतु नीघाळा ॥ २९३ ॥ थाबरझांटी सोडुनी : मुप पसरोनी : जैसे काळे कर्कट नीघोनी : तैसें धावीनलें ॥ २९४ ॥ म्हने साहे साहे रे धीरा : हानीतला खर्गधारा : जैसे काळदंड अवधारा : तैसें सें सस्र ॥ २९५ ॥ सुद्रसेन केले अस्र : सस्र सतखंड केलें अवधारा : धीसीतु जाह्याले अवधारा : सुत्र करीतानी अवधारा : मग काये केले देवांगे ॥ २९६ ॥ गदा घेउनीयां हातीं : हानीतला नीगुती : मग सांवरोनी नीगुती : झेप घातली ॥ २९७ ॥ देवांगें कीरान घेतले गगनी : हानीतला कोपुनी : सीर गेले तुटोनी : झाली दोनी धडे ॥ २९८ ॥ धीभंगु जाह्याला नीळासुरा : दोनी सकळें प्रवर्तली घोरांधारा : धुधुकार करीताती अवधारा : कवने परी ॥ २९९ ॥ येक हाने आसीं : दुसरे युध्यासी : मग वीचारीले मानसी : ते अवधारा ॥ छ ॥ ३०० ॥ छ ॥ सीरा धडा मंधान : केले येकेच घेलें त्याचे नीर्वान : मग झाले अणेआण : नीळासुराच्या दळासी ॥ ३०१ ॥ नीळासुरु आणिला रणासी : वीरश्री हुनावली मनासी : बहुत संतोसीं : आनंदला ॥ ३०२ ॥ अहाकारु प्रवर्तला : दैत्या दचकु पडीला : देवांगु सन्मुप चालीला : जेथें पळाला नीळासुरु ॥ ३०३ ॥ तव उठीला मोळगासुरु : हरीतासुरु बहुत सत्वापारु : ढवळासुरु : चौथे उठीले देवांगावरी ॥ ३०४ ॥ बहुत घोरांधर यौध्ये प्रवर्तेळे : येकमेकांचे घाये नीवटलें : बहुत रणासी आले : नीसांचर ॥ ३०५ ॥ मग नीवाडें पाचारी मोळगासुरु : तुं मला रणरंगधीरु : त्वां जीतीले येके येकु धीरू : मजसि यौध्ये करीं × × ठाडें ॥ ३०६ ॥ म्हणे देवांगु तुम्हा राक्षसा : नळ......वरीन रणरंग धीरु : मोळागासुरा ॥ ३०७ ॥ साह.....गासुरा : हाणीतला चक्रधारा : उसळला आवरा : आवचीता पडीला देवांगावरी ॥३०४॥ चक्र होते माथ्यावरी : अदळला तो येचरी : जैसा पाषान लागे तैसापरी : पडीयेला देखा ॥ ३०५ ॥ देवांगु हास्य करुनी थोलियेला : भला रे प्राक्रमु केला : कोपोनी उठीला : मोळगासुरु ॥ ३०६ ॥ आरें देवांगा वीरा : मि पवळ्लों रे सचरा : हाणीतला पर्वतभारा ॥ देवांगाते ॥ ३०७ ॥ यंत्रे हाणीतळा पर्वतु सत कुटु केला : सवेची चक्र घेउनी धांवीनला : दोघां संग्रामु थोर झाला ॥ आसुधें थाहीली मेदुणी ॥ ३०८ ॥ मोळगासुरें अस्त्र बाण सांडीयेला : धगधगीत पातला : देवांगु वेढीयेला : अस्त्रजाळीं ॥ ३०९ ॥ मग मेघसस्त्र स्पुरीलें : आह्नीते संत केलें : मग सैन्यावरी धाविनले : कवणेपरीचे मेघ ॥ ३१० ॥ सीळा मारी वर्षतानी : दैत्यांची कपा...सज पाहाता मेघ नव्हेती : जे काळदंड येमाचे ॥ ३११ ॥ मोळगासुरें करुणास्त्र घातले : मेगाते तोडुनी नेळे : दोये संत झाले : अवधारा ॥ ३१२ ॥ देवांगे हाती चक्र घेतलें : हरींचें सुमरण केले : सप्राणे हाणीतलें : मोळगासुरातें ॥ ३१३ ॥ मोळगासुरु वेला आसुदु : सुद्रसेण दैत्यां प्रसीदु : देउनियां कंठु मधु : सीर गेलें आकासासी ॥ ३१४ ॥ मोळगासुरु आणिला रणासी : परमरण नाहि त्या दैत्यासी : सीर आलें धडापासि : मुख उपराटे लागलें ॥ ३१५ ॥ मागुता संग्रामि उभा ठेला : देवांगु वीस्मेतु झाला : मग काये बोलीला : ततक्षणि ॥ ३१६ ॥ देवांगु

म्हणे मोळगासुरा : संग्रामि जींतीलासी अवधारा : मुष न दाविसी अवधारा : धीकटरपां ॥ ३१७ ॥ मग म्हणे देवांगु : कुपी करावि कैसी : मरण नाहीं दैत्यासी : वीचारी तो मानसि : तवं उठावला दळभारु ॥ ३१८ ॥ पयळला हरीतासुर : त्याचा सुतु पिंवळासुरु : दोघे बहुतु सत्वाधारु : तीही धाचारीले देवांगातें ॥ ३१९ ॥ म्हनती देवांगा वीरा : त्वा जींतीले मोळगासुरा : मुड घेईन अवधारा : सींहींनादे गर्जिनला कैसा ॥ ३२० ॥ पेचर पाण सोडीले देवांगावरी : काये सांगो त्याची थोरी : दीसा धुधुकार : भयाचक्रीत दीसताती ॥ ३२१ ॥ पेचरी लांवां झोंवताती : धाउं गिळु म्हनताती : वीकळ जाहाला चित्ती : मग भैरवें सत्व पैरीलें ॥ ३२२ ॥ कैसें काळ भैरव चढीले म.............कटळे : पेचरावरी धावीनलें : मावे माव हरखी : ने अवधारा ॥ ३२३ ॥ रागे बहुत संतापे : व्याघ्र झाला कोपें : घुरघुरुतु हो पें : हळदासुरु ॥ ३२४ ॥ ,मग देवांगें काये केलें : सोंह स्वरुप धरीलें : व्याघ्राते वीदारीलें : तैसा तो देवांगु वीरु ॥ ३२५ ॥ पिंवळासुरु ढवळासुरु : बहुत हुंकारें धांवीनला आधार : माहाभयंकाररुपे : ढवळासुर : बहुत हुंकारें धावीनला ॥ ३२६ ॥ दोघे जाहाले दोहिकडे : झुझताती कवणे पाडे : वेगीं वेगीं धडफडे : सत्र जादरीसवानी ॥ ३२७ ॥ येकु हाणे वज्रपानी : दुसरा पर्वंतु घेउनि हानताती : सीळा धोंडीं असंख्याती : पडताती देवांगावरी ॥ ३२८ ॥ ग्रैसे भांगी वज्रपंजर : तैसे सुद्रसेन आधार : तोडुनीया पर्वतभार : चक्रधारीं सतकुट होवानी ॥ ३२९ ॥ देवांगु म्हने पीवळासुरा : साहे साहे रे वीरा : हाणीतला चक्रधारा : सत्राणें ॥ ३३३ ॥ हातपायें छेदीला : मग हरीतासुरावरि धावीनला : कोपोनी हानीतला : मुस्टीघातें ॥ ३३४ ॥ सीर गेले कोथळांतु : भुंई पडीला चाचरतु : मग हाणीतला चरणघातु : दोघे रणासीं आणिलें ॥ ३३५ ॥ पाचै मुरुखे नीसांचरु : अतीबळ पराक्रम वीरु : ते जिंनीलें आधारु : पर मरन नाहिं नीसांचरा ॥ ३३६ ॥ मग समस्त दैत्ये येकवळा केला : मोंरला देवांगु वेढीला : गजरु थोर मांडला : नीसांचर ॥ ३३७ ॥ आहाकारु प्रवर्तला श्रीमुखनी : धरधरों कापे धरनी : सेपु पुस्टी वळुनी : भयाचकु झालें ॥ ३३८ ॥ आपुल्यान समर्थकरणी : हानताती म्हेटुनी : सीळा धोंडी पर्वतु आनुनी : टाकीतानी देवांगावरी ॥ ३३९ ॥ नारायेणु होता स...

( ओव्या ४४६–४७० )

......व्योमीं नीरोपु दीधला : म...मधा केला : नाना कुमरी लोपेसरा : सोभीवंत ॥ ४४६ ॥ गौरी कुंकुमि सकटीक मीळाळीया : वोहरामी हळदी लावी-लीया : मग चौक भरलीया : आभ्रावर्ने करीतानी ॥ ४४७ ॥ आतां रम्हादीवनी : पाण्यांते रार्वोली फेमी : महाम्बनीं उमदे आकाशि : पंचमास्ये करनी ॥ ४४८ ॥ मंडपि तोरणे बांधलि : रत्नखचीत योचले केले : चंदनाचा पाटु करनी टेवीला : मग ब्र(ह्म)हवनवीधी ॥ ४४९ ॥ ब्रह्मा म्हणे ईश्वरा : हवन करवें फरावें : मग

लग्न लावावें : तें फळसीधीं जन्मोजन्मीं ॥ ४५० ॥ ईस्वराच्या मनासी आले : मग हवन आरंभीलें : आस्टोतर सते ग्राम्हन बैसवीले : मग रचीलें वीधान ॥ ४५१ ॥ हवनकुंड फेलें : सोडस उपचारीं पुजीले : आग्नी प्रजळु लागले ॥ मंत्रघोक ॥ ४५२ ॥ पंचाम्रुते घोळुनी : आहुती घालीताती हवनीं : सप्तीमुपें प्रसन्न होउनी : सीधे मागतानी ॥ ४५३ ॥ हवन बर्वे जाहालें : पुर्न आहुती नारीयेळु घातला : अर्ज्ञी पुरुष प्रसंन (जा)हाला : कन्या उद्भवली हवनकुंडी ॥ ४५४ ॥ बरीं रूपवंत सौंदरीं : मछ आहे बुबळावरी : उमापती म्हने आवधारी : ग्रम्ह हरी ॥ ४५५ ॥ आधी देवदैत्या नोवरी ॥ मग आज्ञी दैत्यांकुंवरी ॥ दोघीं आस्तीयांवरी ॥ देवांग ॥ ४५६ ॥ मग दैत्यांसुरी : सुलक्षनीक नोवरी : आनीली सर्वे श्रींधारु करुनी : ग्रम्हयानें ॥ ४५७ ॥ पाईं पैंजन घवघवीती : कानी भोवरींया लोळति : गळा पदकीं पंक्ती : नवा रत्नांची ॥ ४५८ ॥ बर्वे लल्हाटीसी सुफुल्ल : मोती नाकीं झळाळ : रत्नपचीत चुडे नेवाळे : हातीं कांकन ॥ ४५९ ॥ नंदी उभी केली : तव लग्नघडी पुरी आली : ॐ पुन्य ध्वनी गर्जली : लग्न लागलें देवांगाचें ॥ ४६० ॥ आसी वाद ग्राम्हनु काकन : ग्रार्धंअपन : मग कन्यादान करुन : आपन बैसवीली बोवल्यावरी ॥ ४६१ ॥ मंत्र अक्षता घेतल्या करीं : वेद मंत्र उचारी : घातल्या माथ्यावरी : वोहरांचीया ॥ ४६२ ॥ देवांगु देवदंता नमस्कारी : आश्रीवाद आमुचा साहाकारी : पुरोहीतु म्हनोनी माथा ठेवीला चरनावरी : मग देवदेवांगणा वंदिता झाला ॥ ४६३ ॥ सीवचरनी लागला : ग्रम्हा नमस्कारिला : नारायेनु वंदीला : मग सकळा दंडवत ॥ ४६४ ॥ वोहरे बोवल्यावरी बैसती : सवास्नीस सभरीती : देवांगना धवळ गाती : आनंदसी ॥ ४६५ ॥ धवळ गाऊ सरले : मग जेवनासी उठवीलें : पाथी बैसले : हरी ग्रम्हां ॥ ४६६ ॥ श्रीवछ ग्राम्हनु : म्हणे दानदक्षनाप्रति देउनु : संतुस्ट करा ग्राम्हनु : ऐसे बोलीले नीवंघी ॥ ४६७ ॥ देवांगे सुवर्नेताट आनुनु : सुवर्नोनी सोळा चौक भरुनु :...ग्री दीधलीया ॥ ४६८ ॥ तु आमुचा श्रीगुरु ग्राम्हनु : ग्रम्हयांचा नातु सगुनु ॥ उत्तमु वर्श सास्त्रनीयापरायेनु ॥ तुमच्यानी जन्म सुफळ ॥४७०॥ थी ... झाली ग्राम्हनासी : हरीहर ग्रम्ह नारायेन : अनपु – घाडा

## (ओव्या ६१५–६५८)

हरी ठेवा होईल यौगातरी : हा सदु नीर्धारी : देवपुरानी ॥ ६१५ ॥ तु जाये वहीला : मुझाधुनी पाठवीला . . . ला : ईस्वाराजवळी ॥ ६१६ ॥ स्वामी नारायेणु प्रसंन झाला : गंगा पाठवा वहीला : म्हणोनी वीनवीला : जगंनाथु ॥ ६१७ ॥ परमेस्वरे गंगा बोलाविली : त्वा सगरा जावे वहीली : तव गंगा काये बोलीली : ते अवधारा ॥ ६१८ ॥ मि जाईन नीर्धारी : उसापी न स्तरी : नस्ट दृष्टी पडेल भरधारी : वीनती सर्वेस्वरा ॥ ६१९ ॥ मग म्हने भागीरथामी : त्वा जावे आधोमुर्पेसी : गंगा इइल सगरासी : मागे पाहों नको ॥ ६२० ॥ ईस्वरा नमस्कार

केला : तेतुनी नीघाला : मातें काये वृत्तांतु झाला : ते अवधारी ॥ ६२१ ॥ जटा मुगटीची गंगा सोडीली : नारायेणें मस्तकी धरीली : मग पालती उतरली : धरनीये-वरी ॥ ६२२ ॥ ते गंगा उपजली हरीचरनी : जैसी समक्ष पुरानी : प्रकटली मंदाग्नी : मृत्यलोकी ॥ ६२३ ॥ गंगा येते अवधारी : वीम्र रचीले कवणे परी : माग्हतु होता अनुस्थानी : भली धडधडीतु ॥ ६२४ ॥ उठ उठ रुसेस्वरा : मी आलीये आसीवारा : रुसेस्वरू बोलुन हुंकारू : तुज मेउनी स्या उठावे ॥ ६२५ ॥ नको नको हुकारी : कां प्रान देसी वाय( × री : म्हणौनी आली गजरी : गंगा परमेस्वरी ॥ ६२६ ॥ जन्हू म्हने तुझे सामर्थसहीतु : मथे जाये लोटीतु : तुझी माझी सामर्थी...ल त्वरीतु : भाग्रो मंदाग्नी ॥ ६२७ ॥ मी परमम्ही मानुस्थाणी : मज कवन उठनी येथुनी : तुझी मामर्थे कीती म्हनोनी : द्रीढ आसणि वैसला ॥ ६२८ ॥ ते गंगा परमेस्वरी : भाली आली आपुल्यान भारि : रुसेस्वरी आपळली कवणेपरी : जैसी गर्जौनी वीज पडे ॥ ६२९ ॥ तव रुसेस्वर न लोटे : अमण थडीठे : सांवरली यक पुढे : आली गंगा परमेस्वरी ॥ ६३० ॥ पळ पळ रे रुसेस्वरा : मी आलों गजरा : मांडी केली आड : जन्हु रुसेस्वरा ॥ ६३१ ॥ जटा तव लोटली भारि : मांडीये अदळली भेंडकरी : तव उसळली गात्रे च्यारी : हासें आलें रुसेस्वरा ॥ ६३२ ॥ हंकारु प्रवर्तला भर्ही : वारा गावे सांडरुनी : नेने हडकळीला कवणे पाहे : जांग फोडुनी नीघाली ॥ ६३३ ॥ मग स्तुति करी रुसेस्वरु : तु आदिसक्ती गंभीरु : वीस्व लोकासी आधारु : पुन्यपाणी ॥ ६३४ ॥ तु वीस्वाची जननी : भुक्ती मुक्ती मदायेनी : होये पापखंडनी : त्रीसलोकांची ॥ ६३५ ॥ तु उपजलीसी माझे जागुनी : मझे नाव तुज आनकुनी : जानवि ऐसे म्हणौणि : बोलती श्रुती सास्ते ॥ ६३६ ॥ जानवी म्हणे तु अमुचा पीता : मांडी उरवीली नी......(श)ब्दुरव तुचके सर्पथा : आसादीरीध ॥ ६३७ ॥ येथे इतुका वेळु लागला : भागीरथु उभा ठेला : येवढा वेळ कां लागला : म्हणौनी परतोनी पाहे ॥ ६३८ ॥ तेतुनी येती हा(ली)...भगीरथाची दृष्टी पडली : परतोनी नीघाली : समुद्रासन्मुप पुर्वमुखें ॥ ६३९ ॥ भागीरथु म्हणे आव कायें जाहाले : होते ईस्वरें सांगीतले : आतां कैसे करावे : मग म्हणे आवो आवो मंदाग्नी ॥ ६५० ॥ गंगा म्हणे त्वा जावे आपुलीया नगरा : मि येईन सगरा : त्वा चींता न करावी : गुसमार्गे आवधारी ॥ ६५१ ॥ श्रावण पुर्नेवेचीं दीनसी : मि येईन नगरासी : उत्तापीण सगरासी : हा नीर्धार ॥ ६५२ ॥ इतुकीयावरी समुद्रा गंगा मिळाली : सहस्रमुख झाली : तीर्थे तीर्थे प्रकटली : कलीमध्यें ॥ ६५३ ॥ भागीरथु गेला नगरासी : गंगा आली सगरासी : पुर्नवे स्तननमासी : सागरा झाली उघरा-नी ॥ ६५४ ॥ ऐसे सास्ते बोलती : मि न सांगे आपुलीया मती : श्रुता आइकावे चीती : करी वीस्वनाथु ॥ ६५५ ॥ पुर्वि जे जे आराधीले : वैसें पुर्ने चालवीले :

---

१ इडकरी आदळला—उपाहरण.

सुकृत दुनावले : सायोज्ये पदिं भोगीतो जाना ॥ ६५६ ॥ पुर्वजांची आक्षाणे आइकती : त्यांची पातके हरती : चीरस्तारेल संतती : पुत्रापौत्री ॥ ६५७ ॥ देवांग सतत...कुळवंत : तुम्ही व्हावे लक्षुमी प्रसंनीत : आले...ज पुरुमा ॥ ६५८ ॥ इतीं ब्रह्मकुते ब्रह्मांड पुराणे गंगाभागीरथी सगर : उधरने सुभ भवंतु आस्वरु ५

( ओव्या ६६०–७७१ )

देवांग कुळी देव ब्राम्हन : चौंडेस्वरी आह...गे तीची उत्पती : उपजली दैत्याचे धंसी : ख्याती झाली कैसी : सांघेन वीजेस्वराचेणी प्रसादें ॥ ६६० ॥ चौथा देवाचे थौसी : उपजली दैत्याचे थौसी : ख्याती झाली कैसी : सांघेन वीजेस्वराचेणी प्रसादे ॥ ६६१ ॥ त्रीपुर सौहारी : ते सांघेन अवधारी : ससीपानात्रे सुचना केली : आदि आंतु सांघेन ॥ ६६२ ॥ आंदकासुरु माहा पेचरु : तप केले घोराघोरु : प्रसन्न झाला ईस्वरु : मागीतले त्रीपुर ॥ ६६३ ॥ भोळा चक्रवंती पुरु : दीधले मीर्धारु : देवा नाहि थारु : यौध्ये मांडलें देवासी ॥ ६६४ ॥ आधींच दैत्यु भयंकारु : तीर्थ रचले थोरु : ते नांगवेती साचारु : प्रकटला माहांकाळु ॥ ६६५ ॥ रागी मांडली खगासी : यौध्ये मांडले देवासी : दैत्यु कपटी कैसी : स्वामीसी परीजीले ॥ ६६६ ॥ तेतीस कोडी देव मिळाले : ब्रह्मा वीस्णु समस्त आले : देवा यैसे काये केले : आता आम्हा ठावो कैचा ॥ ६६७ ॥ कपट दैत्यांचा मानसी : मि कृपाळु भक्तरंसी : मागीतल्या नाही कैसे : लोटावे ॥ ६६८ ॥ असाचीं दैत्यु भसमेस्वरु : तप केले उग्रु : प्रसंन झाला नीळकंठु त्वरीतु : मागीतले ते द्यावे ॥ ६६९ ॥ मस्तकी हातु ठेवणे : भस्मु होने : यैसा वरु देणे : परमेश्वरा ॥ ६७० ॥ यैसा कृपाळु सर्वेस्वरु : भक्ताकाजकैवारी : तो मागीतला वरु : त्वां दीधला ॥ ६७१ ॥ पुनरपि तो क... मस्तकि हस्तु ठेवणें : त्याने भसकरणें : पार्वती घेउनी जाणें ॥ ६७२ ॥ तव मस्तका करु ठेउ आला : ईस्वरु पळो लागला : तेणे पाठीलागु केला : सरीला नारायेणु ॥ ६७३ ॥ आला माये राणी होउनी : आड उभा ठाकोणि : कां धावतोसी यरळ होउनि : म्हणे मायेरानी ॥ ६७४ ॥ तवं ईस्वर वडवुधु झाला : वारा गावे वीन्मारला : पार्वती झाली येक्षणिकळा : मायेराणि धर्मो लागली ॥ ६७४ ॥ भसास्वरु झाला मोहितु : मायेराणि करी धरीनु : म्हणे स्थीर स्थीरु होये नीस्वलु : ईस्वरु झाला भस्मभुतु ॥ ६७५ ॥ भसास्वरु म्हणे उमासक्ती : आतां मण होई नीस्चींतु : चला जावो राजभुवना : आलोचीत ॥ ६७६ ॥ म्हणे मायेराणि हा पवीत्र वुधु : आम्ही तुम्ही खेळो धीळासु : मानसि होतो संतोसु : भसास्वरा ॥ ६७७ ॥ मी जैसें खेळैन त्वां तैसें खेळावें : संतोसी मनी उलासावें : मग येथुनी जावें : नीजस्थाना ॥ ६७८ ॥ ब्रम्हध्वनी उमटली सांगो कैसी : पंचम घाद पे गर्जती जैसी : ते आनंद धीळासी : खेळतानी : ॥ ६७९ ॥ दोघे वीनोदे खेळती आनंदे : लागला माये राणिमदे : भसास्वरु ॥ ६८० ॥ जसें खेळे जगमोहीनी : तैसे खेळे तो दैत्यु नीर्वानी : आलें कर्म

टाकोनी : भस्मासुरा ॥ ६८१ ॥ भस्मासुरु बरळु झाला : आपुले मस्तकिं कर टेवीला: आपणेची भम्म झाला : पाप पापें हरले ॥ ६८२ ॥ बापु कौ . . . रणरंगधीरु: मारीले भस्मासुरा : मग पाचारीले ईस्वरा : झाला दृष्टानु ॥ ६८३ ॥ आम्ही देखीलीं भुवने कंसौंदरी : कामज्वरु प्रकटला ईस्वरी : ते समक्षा आवधारी : कवणेपरीसी ॥ ६८४ ॥ बिंदुस्वरुपि ढळला : मायेराणी करीसे लीला : आर्धा खाली पडीला : झाली दोनी स्वरुपें ॥ ६८५ ॥ भोईं पडीला तो मेराळु : हातीं राखो भैरव काळु : दोघे कुंवर सबळु : ईस्वराचें ॥ ६८६ ॥ नीज स्वरुपि नारायेणु : दोघे एकत्र होउनु : नीगाले तेथुनु : नीजभुवनासीं ॥ ६८७ ॥ ऐसे भसाम्वरे केले : त्याचें कपट त्यासी भोवले : तैसे आंदकासुरे माडीले : आली देवा ॥ ६८८ ॥ तवं आला रे आंदकासुरु : प्रवर्तेला माहा भयंकारु : ईस्वर प्रसंनीक घोरु : देव दडपीले नीर्चीतनु ॥ ६८९ ॥ पर्वतु उलटोनी टाकीतु : कैळासु जाळोनी भस्म करीतु : पापरे हाणितला सवपंढ फेला : लेप नाहीं कैळासें ॥ ६९० ॥ आला धावत आवेसे : पार्वतीकु काळ जैसें : सक्तीळवसे : पवळला दैत्युनाथु ॥ ६९१ ॥ तव प्रम्हानें प्रम्हसाम्री पीळीला : वीस्नुने माघ्यारुपि राहावीला : सक्तीनें उल्हादीले : नाग . . . वीस्नुसी ॥ ६९२ ॥ भवर्षी स्वर्गं घेतली : देवा . . . सुटली : कनव भाकीवाती जीम्हाली : सीव जगंना(था) ॥ ६९६ ॥ राज्यें दीघले दैत्यासी : उठवीले देवांसी : आकर्मि मान . . . प्रसन झालासी ॥ ६९७ ॥ हरहरा काये येसे जाहाले : देवाचे देवपण गेले : दैत्याचे राज्ये झाले : येसे बोलताती देवागण ॥ ६९८ ॥ ईस्वर म्हणे मी भरको प्रसनीक जाने : देतों आदीक उने न म्हने : येसेचि मागीतले रावणे : चौंदा चौकोट्याचे राज्ये ॥ ६९९ ॥ नंदी पार्वती चंद्रा योध्ये : अडट कोडी आउक्ष सीघे : अवघे केले सीधे : श्रीनारायेणे ॥ छ ॥ ७०० ॥ छ ॥ रावणे सुवीचे आणि वरी तप केले : नंदी पार्वती चंद्रा योध्ये मागीतले : इतुके इतुके अवघेची दीधले : नीचीत बैसले कैळासि ॥ ७०१ ॥ सीव तपि बैसला : तेथे नारायेणु आला : कौसाल्य केले : आवधारि ॥ ७०२ ॥ येक रची- येले सरवर : तेथें बसवीली मंडोधरी सौंदरी : माव नदी चंद्रा मुग्धें आवधारी : रचीले येक येक विंदान ॥ ७०३ ॥ अपणें प्रम्हाच्या नीरुपे : सतमुध स्वरुपे : मणी बहुत कोपे : सन्मुध येता झाला ॥ ७०४ ॥ नंदीररी बैसोनी : पार्वती पुस्ता घरुनी : बहुत संतोसु करुनी : येतो लंकेसी ॥ ७०५ ॥ तव सन्मुप देखीला मुख माम्हणु : नमस्कार म्हणे रावोनु : दास्रें आनुभवी म्हनोनु : बोलीला माम्हनु ॥ ७०६ ॥ दास्र अनुभवी म्हनीतले : रावणाचे . . . मेदले : दुस्ट हाउनी काये बोलीले : आज्ञान तुम्ही ॥ ७०७ ॥ आम्हि सत्यच बोलावे : आसत्य न बोलावे : पापे ण पहावें : हा परमार्थु ॥ ७०८ ॥ आम्हि तप केले उग्र ईस्वरु प्रसन . . . तः मागीतले त्वरीत : नंदी पार्वती चंद्रा योध्ये अट कोडी अउसें ॥ ७०९ ॥ आरे वेड्या रावणा : हे ई(स्व)राची माव जाना : नंदी पार्वती चंद्रा आइघे दौरदी पडेल कवना : आदे येक पाताळ वीवरी ॥ ७१० ॥ म(ग)धाको लागला रावनु : उतरोनी लागला चरनी : स्वामि ते तुम्ही वीवर जाणा :

ते सुचना करावी मज ॥ ७११ ॥ तुम्ही जें मागणें : ते आम्ही देणें : हा नीर्धारु मानने : अमचा ॥ ७१२ ॥ आम्हा राज्ये लक्षुमि काये करणे : तीन कोडी सांडोनी आर्ध कोडी आउक्षे देणें : आम्ही तुम्ही स्वप्नासी जाणे : यैसेची ॥ ७१३ ॥ तेथुनी नीघाले आवेसे : आले स्वप्न भुवनासी : केली सुचना यैसी : द्रीष्टी आंगुळीये ॥ ७१४ ॥ रावणु आला ईस्वराजवळी : स्वामी भक्तु वंचनुक केली : म्हनउनी सांडीली जवळी : नुपसता नीघाला ॥ ७१५ ॥ गेला वीराजवळी : प्रनेसला ते वेळी : भवनेक सौंदरी देखीयेली : मग हो रे म्हणे ते मानसी : ॥ ७१६ ॥ हे पार्वती होये म्हणौनी : नंदी चंद्रु घेउनी : नीगाला तेथुनी : देश न पुसता लंकेसी ॥ ७१७ ॥ तेथुनी रावो निघाला : लंकेसी येता झाला : सन्मुप मुनि भेटला : त्यासी केले दंडवत ॥ ७१८॥ हमौनी मुनी बोलिला : रावणा बहु तुथे नाडीले : नारायेणे कौसाल्लें : पुर्वि दीधली तेची पार्वती ॥ ७१९ ॥ नंदी चंद्र यौधः मात्र अवस्तरी : इतुके म्हणोन .... मासमासी ॥ ७२० ॥ रावणे मनि होकारिले : ... परजीले : सीतेसी चोरनी नेळे : रावणे ॥ ७२१ ॥ मग दळ रचले रामा रावणा : सीता नेली त्या रावणे : ते सोसुनुंक होईल कवना : येका रामा श्रीरामांवांचुनीया ॥ ७२२ ॥ इतुके रावणे आपेते केले : त्याचे कर्म त्यासीच भोवले : तैसे आदकासुरें मांडीलें : भोर्वान ॥ ७२३ ॥ ब्रम्हा वीस्णु महेस्वरु : करीतीती वीचारु : दैत्यु प्रकटला थोरु : याचे एक वीचारु : नीर्वान ॥ ७२४ ॥ तरं आला रे आदकासुरु ॥ महामारी पेटला तो नीसाचरु : ईस्वरु प्रसनीक थोरु : तो ना गवे कवनासी ॥ ७२५ ॥ काळीयासु लागला : तेजुनी तेज नीगाला : आदकासुरु पडीला : दैत्यनाथु ॥ ७२६ ॥ माहाप्रासु केला : सर्वत्रे व्यापीला : स्थुळ स्वरुपे वाडीनळा : काळस्वरुपि ॥ ७२७ ॥ ब्रम्हा वीस्णु महेस्वरु : सुक्षम स्वरुपि तेजाकरु : ब्रम्हप्रकासु थोरु : काये करील ॥ ७२८ ॥ येव्हडी मात्र आदुकासुरे केली : ब्रम्ह सास्त्र नीवास्त्र चींता प्रवर्तली : देवासी ... राक्षस म्हणे कैळासाउनी : ठाकुनी उपटोन ... कैसाती : आपे अपराज्ये येईल ॥ ७२९ ॥ ... उपटी : दुसन्यावरी टाकी : यैसें उ ... भयंकारी ॥ ७३१ ॥ गजबजीले हरीहरा ब्रम्हादिक : ... सकळीक : संभुने चींतीले येक : सक्तीबळ ... कैळासें पिळीली सक्षपाताळे अपळीली : आखड बसवीली : कोपुनी द्रीस्टी केली : आदकासुरावरी ॥ ७३३ ॥ सस्त्र घेनले करीः त्रीसुळ आवधारी : कोपोनी होकारी : दैत्याकडे ॥ ७३४ ॥ मग जानीतळें आंतकरनी : बाळकाचे रूप धरनी : लीळा कोमाळी करनी : प्रेम आन्हानीले ॥ ७३५ ॥ मग रुद्रकळा वीराळी : साती कळा भरळी : काये बोलीले : तो महेस्वरु ॥ ७३६ ॥ जया जया इतुकीयावरी : त्रीपुरी राज्यें करी : का मारींसी वाया करी : आदकासुरा ॥ ७३७ ॥ हरी ब्रम्हादीक म्हनताती : येव्हढी वीरांसी सक्ती : आता क्षांती : करील दैत्युनाथु ॥ ७३८ ॥ स्वर्गे घेतली : त्रीपुरें यळकावीली : राक्षस प्रकटले : देवपन राहीले ॥ ७३९ ॥ मनताकु जनकुरु द्रीरन्या : वरार्ध : कुपवार्ध तांमतनु : नीसत नीर्नाव : सोमाप्नुत्यु : ताळ नीळ नीचेन : आतर्पोम : माहार्पोस : वीजतनुः मीतेनतुः

जोतीरुप : ज्ञानद्रीस्टी नीसुन्ये कुपीना ॥ ७४० ॥ ऐसी येकवीस स्वर्गे बोलीली : वीस स्वर्गे घेतली : येकवीसा स्वग्रासी : लागी माडीले दैत्यराये ॥ ७४१ ॥ सवघी घेतली स्वर्गे ये उरलें : देवा . . . काकुळती आलें : देवांगणा माता देवत्व उडालें : म्हणौनी बोलती समस्त ॥ ७४२ ॥ हाहाकार प्रवर्तला : ब्रम्हा . . . आदि सकळा : प्रभु जानवला ॥ ७४३ ॥ ब्रम्हा वीस्णु महेस्वरु : करीताती वीचारु : दैत्यु प्रकटला थोरु : याच . . . विचारा पा ॥ ७४४ ॥ तव बोलीले देवगुरुगु : याचे आ . . . ई गर्भवासु : तो करील कुळानासु : आधकासुराचा ॥ ७४५ ॥ वीस्णु म्हने मायागण : ते पतीव्रता सगुन : तीचें व्रत ढळेल कवना : तें वांज कन्या पुत्र नाही : ॥ ७४६ ॥ आंधकासुराची जन्मपत्रीका येमी : पुत्र उपजेल येसी : तो करील सौहारु समस्तासीः ऐसे लल्हाटी रेपिले ॥ ७४७ ॥ वर्म ठासीयेले : मग वीचारी पडीयेले : तीघे वैसोनी बोलीले : अवधारी ॥ ७४८ ॥ वीस्णु वर्म सांगें येवें : आम्ही तीघे त्रापुरा जावे : क्षीरस्वरुपि प्रकटावें : मुनी जाईल नगरामाझारी ॥ ७४९ ॥ जळकुंड ब्रम्हाते होआवे : ईश्वरु लीगस्वरुपि वैसावें : वीस्णु अस्वत्थ होआवे : येसे तीघे आभीळाक्षी न्यापावे ॥ ७५० ॥ मुनी गेला आधकासुराच्या घरा : मायामंती प्रभु उठली होती आनधारा : द्रीस्टी देखीली स्वयंकारा : मग उठोती नमस्कारीलें ॥ ७५१ ॥ येमकारु करुनी : चर्न तीर्थ वंदुनी : दोन्ही कर जोडुनी : काही सफळ होईल पुत्रा पवीत्राची ॥ ७५२ ॥ डावा कर हाती धरीला : तुज वीस्तार होईल भला : येक तीर्थ करावे नीर्मळ : पुन्येक्षत्र असे......
...मायामंची मणी संतोसली : हरीपे मुने.........कवण तीर्थ गंगाजळ : चाला स्वामीया ॥ ७५४ ॥ तेये बोलाउनी नेले : क्षेत्र दावीले : आभीळ......हानीले: झाली वाळा ॥ ७५५ ॥ मुणि म्हणे आजी पुन्य.........वनी : स्नान करावे सुमती : होतील कन्या पुत्र म्हनौनी.........मार्गीतले ॥ ७५६ ॥ मग स्नानाची केली आइती : गुणी म्हने मायावती : आम्ही ब्रम्हचारी जान नीगुनी : स्नान करावे नीर्गुनीसी ॥ ७५७ ॥ तैसेची लीग दरुशन होआवें : आखस्त कवळावे : मग दान दक्षता देणे : ऐसे विधान सांगीतले ॥ ७५८ ॥ मग तर्वे टेवीली : कुंडी स्नान केलें : मग लीग दरसण झालें : मग पिंपळ कवळाला ॥ ७५९ ॥ येउनी रुसेस्वराच्या चरना लागली : वस्त्रे परीधान केली : मग मंदीरा बोलावीली : मुनेश्वरे ॥ ७६० ॥ तव झाली गुरोदरी : बहुत हरीष सौंदरी : माया प्रेम थोरी : सर्व ठाई ॥ ७६१ ॥ सर्यकाळ झाला : तव आंदुकासुरु आला : देपीली गर्भकळा : झाला हरीखे नीर्भर ॥ ७६२ ॥ च्यारी प्रहार रात्री जाहाली : प्रातःकाळी प्रसुता झालीः आनंदे थोर वीमली : धर्मु करीता जाहाला ॥ ७६३ ॥ ते उकुळी कन्या माहा भयंकरी : सौदरी त्या कोर : दाढा दिसताती कवणे परी : नाक सरळ फरळ कान ॥ ७६४ ॥ नारदु आला......सी बहुत सन्मानु केला त्यासी : जन्मपत्रीका पा.........स्वामि मुणेस्वरा ॥ ७६५ ॥ मग मुनी वर्तु......महामाया चौडेस्वरी : माहा भयंकरी कुळवैरी ही......हावे ॥ ७६६ ॥ मंगळ नक्षेत्र आवधारी......उपजों मैथे कुंवरी : डाईनीना सुसाचे ॥ ७६७ ॥

. . . . . . आकीला : आंदुकासुरु दचकला : उपचारु : काये पुसीला : ते अवधारी ॥ ७६८ ॥ येक पांजीरा करुनी : हे बालक घालुनीः कैलास उचलोनी : बुडी टेवानी ॥ ७६९ ॥ मुनीनें सांघीतले : तैसेची पाजीरां घातलेः नेउनी कैलासाउनी टेवीले ॥ ७७० ॥ पुढें वर्तली कैसी कथा : . . . सांगैल श्रीस्वनाथा : पुन्यपात्रन ॥ ७७१ ॥ आवस्वरू ७ ॥ छ ॥

## ओव्या ७७२–८११

अवघे राज्यें घेतले : देवांचे देवपण गेले : येक स्वप्न उरले : त्यासी लागी मांडीयेले ॥ ७७२ ॥ लागी माडीली स्वप्नासी : देव सुरवर गर्जताती कैसे : झाकीतानी येकमेकाते : माहा भयकार गर्जताती ॥ ७७३ ॥ उठीले नंदी भैरव माहीकाळु : तद्रादी सकळु : पेचराती वीकळु : जुझतानी कवनेपरी ॥ ७७४ ॥ नंदी महामारी पेटला : भैरव काळस्वरूपि संचरला : रुद्रपेचर मार्गि आवतारला : भये प्रवर्तलें दैत्यासी ॥ ७७५ ॥ नंदी हाणोनी दइतु सत पंड करी : भैरव सीर धरी : माहांकाळु ग्रासु करी : रुद्र संहेतु मांडला ॥ ७७६ ॥ ऐसे मांडले नीसाचरा : परदैत्यु सरवा-पारु ॥ थोर सानरोनी नीसाचरावरी : धाविन्नला ॥ ७७७ ॥ प्रसनीक ईश्वराची : सक्ती झाली याची . . . त्याचेंः तेथे यैसे कैचे ॥ ७७८ ॥ मग नीवारले . . . गजाननु : तीही पडीताळीला नंदी भैर : साहे साहे म्हन . . . ला घन्नघातु ॥ ७७९ ॥ ते नीवारीले नंदी भैरव : धानीनले क्षेत्री गहण : तव उडाला गगन माझे : ॥ ७८० ॥ मग पवळला नंदी भैरव माहांकाळु : घालीतानी जाळु : उजनीया आज्ञा घटकर्नाचे जीव्हाले : गदाघाने हानीतला ॥ ७८१ ॥ मारीला घटकर्नु : तव धानीनला गजाननु : साहे साहे म्हणौनी : फासांकुसी ॥ ७८२ ॥ नंदी गेला नावेक वीकळु : तव धानीनला भैरव म्हाकाळु : हाणीतला गजाननाचा वक्षस्तळु : काळदंडे ॥ ७८३ ॥ सीर सतपंड झालें : मग राक्षसे सैन्योकडे पाहीले : काळस्वरुपं पळरळीले : भैरवी मारीला राक्षसं ॥ ७८४ ॥ काळभैरव सैन्यामाजी वीचरला : दैत्यास केतु मांडला : हा नागवे रे यहीला : म्हणौनी पळतानी ॥ ७८५ ॥ दैत्या करीनी हाहाकारुः ते आईकोनी आधेकासुरूः पवळला माहाकाळुः कोपारुढ जाहाला ॥ ७८६ ॥ येक हानी पर्वत धोंडी घेतानी : तेणेची हाणतानी : येक धोंडी टाकीतानीः गदावज्रे अनेके ॥ ७८७ ॥ . . . मग रुद्रे पडपळीलें : आज्ञसद्म मोकलीले . . . धावनिलें सत्राणें ॥ ७८९ ॥ अग्नि माहामारां . . . दैत्यासी घोरु लागला : मग पळनाती नीसाचर ॥ ७९० ॥ हाहाकारु प्रवर्तला त्रीभुवणी : थरथरा कापे धरनीः हा नेत्र धरा पा करनी : हे नीर्गान माडलें ॥ ७९१ ॥ आधकासुरे काये केलेः जळमाया पीया सुमरीलेः अन्नीते संत केले : नेतु आला योध्यासी ॥ ७९२ ॥ मग धावीनला आरेसी : गीळीला लाहानसाहान सैन्यासी : भये प्रवर्तले देवासी : म्हननी प्रकटला रे माहांकाळु ॥ ७९३ ॥ महेस्वरें काये केले : पेचररुप धरीलें ॥ च्यारी दीशा व्यापीले :

प्रती राक्षसा ॥ ७९४ ॥ माहां भयंकार गर्जती : पेचर दीसती : चाल्लेलें आसाक्षाती : आंधकासुरावरी ॥ ७९५ ॥ येक भुचर पेचरु : येक वीकटरुप वीकारु : काळे कर्कट भ्यासुरु : प्रकटले भाद्भुत ॥ ७९६ ॥ तव देपीले आधकासुरें : या प्रर्तीरे कवन नीसाचरे : तव गर्जीनलें नीस्टुरें : हाक फोडीनी ॥ ७९७ ॥ पुढे होतां नीसाचरु : त्यासी नव्हेची धीरु : पळताती सांडोनी हाती(ये)रु : आता ठावो आम्हा कैचा ॥ ७९८ ॥ मीसळले सैन्यामाझारी : हानतानी येके येक नीस्टुरे : न कळे कवन कवनाते मारी : आपेआप वीसरलें ॥ ७९९ ॥ आपुलें मरन नेनती : पप्र येउनी नीस्टुरे हानती........डीले बहु क्षीती : मारे काळमृत्यो......॥ ८०० ॥ छ ॥ छ ॥

म्हणती सीव रसला......सुकला : मग झाला कोल्हाल आपेअप ॥ ८०१ ॥... तले आदकासुरे : होई ईस्वर माया खरे :........ या पेचरें : कर्कसा माया ॥ ८०२ ॥ वीद्या पेचरीया......स्वयंकारी : मोकलीले सैन्यावरी : आवधारा ॥ ८०३ ॥ पेचर... वा धावती : माहा भयंकार गर्जती : देपोनी कैलासपती : मणी वीस्मीतु झाला ॥ ८०४ ॥ येक भ्यासुर पेचर : येके स्थळ सुदरे : वीकट रुपे गंभीरें : ऐसी प्रकटली कर्कस माया ॥ ८०५ ॥ पेचरारारी चालीली : कर्कसा दोही भेटी झाली : वीकारे व्यापीली : खेचरांतरी ॥ ८०६ ॥ येक येक पेचरा : सात पाच होनी नीस्टुरा : यंवुनादी कवळीला सा चीरा : मदन सखे भेदीती ॥ ८०७ ॥ मार माव झाली सातु : दोनी दळे झाली नीवांतु : काये करी दैत्यनाथु : ते आवधारा ॥ ८०८ ॥ पैसियां याचुनी : नव्हे रे म्हणोनी : देव ते आनीली धरनी : मग आम्हासमोर कवण ॥ ८०९ ॥ मग पार्वतीचें रूप धरूनी : । प्रवेसला कैलासभुवणी : ईस्वरु होता चींतामणी : जाउणी दोन्ही चरन चुरु लागली ॥ ८१० ॥ स्वामि कष्टलेती भारी : सी...ळे सी थोरी : नीद्रा करा सिंहासनावरी : म्हणौनीया मो...जगंनाथु ॥ ८११ ॥ माहादेवो सींव्हासनी नीद्रा करी... नी घेतले सीरी : मग नीघाली पेचरी : भ... तवं देपीले भैरवि : कवण रात्री जाते...

## (ओव्या ८२५–८८०)

सखे घेउनी हानताती : येकमेकां पाचारूनी...ताती ॥ ८२५ ॥ गर्जताती दोन्ही दळे : ...से सहस्र वीजा येके वेळे : तैसा नादु उठला गज......म्हादु गोळकु : म्हाभये चकीत मांडले ॥ ८२६ ॥ कुर्मा पुस्ट...ळ्ली : सेकु थरारों कांपों लागला : म्हनती प्रळयो मांडला : ...तां कैचें त्रीभुवन ॥ ८२७ ॥ येके येकु हाकीती : येके येकु मारीनी : सीरे धडे उसळ्ती : गगनमाम्रे ॥ ८२८ ॥ धडेखणी सीरे जुझती : येक येक न ढळ्ती : नोहटले बहुती : नीसाचर ॥ ८२९ ॥ स्वर्गे घेतली : आकास व्यापीली : दीसा रुधली : माहाकाळे ॥ ८३० ॥ येउनी बैसले स्वर्गद्वारी : देव कोंडीले भीतरी : सकळीक व्यापार राहीले : देवांचें ॥ ८३१ ॥ सकळे दं यौध्ये करूनी : आले मीळोनी : रापा रापां स्वामिया म्हनोनी : नाही तुज वांचुनीया

॥ ८३२ ॥ येक काकुळती येती : येरु कुपा भाकीती : येक कोल्हाळ करीती : सीव संभु तुंची गा म्हणोनी ॥ ८३३ ॥ देव लोकाची तळमळी देपीली: सीव संभुसी मायां झळंबों लागली : घामु सूटला कपाळी : सभ्रु जाणरला जगंनाथा ॥८३४॥ रागें बहुत कोपे करनी : ल्लहाटीचा घामु उत्तरली :...नीरपोनी : कैळास हाणे...... ॥ ८३५ ॥ घामें कैळासु वीभंगु केला : . . . लागला : नीचींतनु होती बाळा : नीद्रम्न प्रकटला : माहामायां ॥ ८३६ ॥ तेथुनी उद्भवली माहामाया (चौं) हेसरी महांभयंकरी : चीक्राळ पेचरी : येउनी वैसला कैळासमीकरीं : पाहाती चहुकडे च्यारी दीसा ॥ ८३७ ॥ म्हणे आम्ही ही सवादावें : अग्घी शास्त्रीयाचें रूप घेणें : हे न . . . पुरुश नांवें : मग जोगीनींरूप धरीलें ॥ ८३८ ॥ तैसी देवा . . . से कळपीली सुरंगे : सम करुनी वेगे : पंचारती भरली ॥ ८३९ ॥ धुप दीप पोफळ : तांदुळ तांबोळ : सुगंध सुपरीमळ : श्राल सन्मुप ॥ ८४० ॥ ग्रम्हा वीस्णु सकळीक मीळाले : उदो उदो म्हनीतले : तेथुनी सन्मुप चालोनी आले : माहामायाजवळी ॥ ८४१ ॥ देवांगे वस्त्रे पुढे ठेवीली : सोडस उपचारी पुजा केली : वस्त्रे देवांगें वाईली : श्ररती धोंवाळीली ॥ ८४२ ॥ देवांगु चरनी लागला: चौंडेस्वरीनें मस्तकी करु ठेवीला : आनंदे बोलों लागला : फुराण श्रालें माहामाया ॥ ८४३ ॥ देपीली अग्घी सत्ती रसी : उलासली श्रांतकरनी कैसी : देपीले राक्षससैन्यासी : वीरश्री प्रकटली ॥ ८४४ ॥ जया जया मंगळजया : चौंडेस्वरी महामाया : जया जया वीस्वरुपि (याः) (मा) हांमारी पेटली ॥ चौसस्टी योगीणी : होरारु करि ..ळ घाटी ॥८४६॥ चरणी वाकी तोड . . . त्रीसुळ डौर कुत सुहानीरु : सीह्मनादे गर्जनली कैसी : . . . ला येकरळा : घ्यारे गर्जिली ॥ ८५३ ॥ सींहनादें गर्जीनला श्रांदकासुरु : बहुत गंभीर उठावला दळभारु : महाम्यासुरु भयेकरु : उठावले येकेंवेळे ॥ ८५४ ॥ म्हने आंदकासुरु श्रपल्या समर्थेकरनु : न्हानवे हीसी नेटुनी : येरु उठावले पर्गे घेउनी : नीसाचार ॥ ८५५ ॥ येक पर्वत टाकीती : झाडे उपडोनी हानती : येक सीळा धोंडी वरीपती : गदा वज्रयुधे (सां) गो कीती ॥ ८५६ ॥ श्रैसा श्रांदकासुरें बहुत रगडा केला : माहामाया कोपु दुनावला : जैसा का पावकु...तैसी प्रजळली महामाया ॥ ८५७ ॥ जैसा . . . भ्रुत्य उठे : तो कवणासी न लोटे : मांडले . . . श्रांदकासुरासी : ॥ ८५८ ॥ बहुत कोपे माहांमाया चौंडेस्वराः जेथे होता श्रांदकासुरु तैरी उडी घातली . . . हुं गज पारधी कैसा ॥ ८५९ ॥ न सपडेची गेली . . . सुरु : म्हनती ग्रम्हा वीस्णु महेस्वरु : उदो उदो म्हणोनि करीती गजरु : आनंदें भोजे ॥ ८६० ॥ धरी धरी पाठी . . . री . . . भंगु झाला : नीसाचरु नीघाला : त्रीपुरा माझारी ॥ ८६१ ॥ श्रांधकासुरु आतर पुरी वीद्ये मनुला : सम वीसम कळाः वैसा न भेदेना चौंडेश्वरी बाळा : म्हणे संभु माहादेवो ॥ ८६२ ॥ त्रीपुर पळकाउनी राहीला : सत्तीविणे निचितन पडीलाः माहाकाळे आव्हानीलाः काये रावेल त्रीपुर

॥ ८६३ ॥ क्षेना येका वीरश्री सत झाली चौडेस्वरी पुजीली सत होउनी बोलीली . सीताप्रती ॥ ८६४ ॥ देवा तुम्हा कस्ट झाले भारी त्रीपुर घेतळ करनेपरी सच राला नीसाचरी येवडा अवघड दार्गो ॥ ८६५ ॥ तप केले उग्र प्रसन्न झाला वीस्वनाथु मागीतले स्त्रीन दोमानी ॥ ८६६ ॥ मी भक्ता प्रेममळु देता नलगे वेळु दैत्य मानती बीकळु पुनरपि गवती मज ॥ ८६७ ॥ कपट केले आम्हासी म्या काये तयाचा मानसी पुनरपि ठाये नाहि आम्हासी धादकासुरे ॥८६८॥ इतुकीया व नीगे माहामाया पुजीली प्रसन होउनी देवागासी ॥ ८६९ ॥ देवागा मि तुझी कुळम्या(भिनी) हागारु निर्वानी सत्यार्थु देपौनी ॥ ८७० ॥ देवाग सङ्ग येमरतु चौयोगी तु मग मस्तकि ठेवीला हातु प्रेमे करुनीया ॥ ८७१ ॥ कीयावरी द्रीस्टी पडली त्रीपुरावरी सींहनादे गर्जताती येचरी तव उग्र तेजे माहामाया होकारी ॥ ८७२ ॥ देवि ज्येकार दीधला सपमेरी मुपका(हा)ळा वाजाने वाइली येके वेळा आबर गर्जिनले ॥ ८७३ ॥ वीरश्रीया आनंदे डोले हाती श्रीसुळडौर घेतलें काळदड ॥ ८७४ ॥ उदो उदो म्हनोनी हुकारी (ले) सीवे त्रीपुर दावीत कोपुनी कीरान घेतले त्रीपुरावरी ॥८७५॥ ते त्रीपुर स वीमम वळाकुसरीं येइल करणेपरी पापीया वोसडीले सर्वेस्वरी दैत्य दीनचीत पडीलें ॥ ८७६ ॥ पवणे सुत्र धरीली वायो सरुचळी त्रीपुर नीस्चळ राहीली मग सधारी दैत्याते ॥ ८७७ ॥ हस्तीदत्त कुदतु दोघे नीवाले हागीतु गवर चाला बहुतु हाक फुटली त्रीभवनातु ॥ ८७८ ॥ ते दोघे चौंडे स्वरी यौध्य कले कवणेपरी ते परीयेसी चीत देउनी ॥ ८७९ ॥ हस्त . जीव्हा यौध्ये करी वीक्षातु हागो गेला लपे धाव कुदतु हाक दउनी ॥८८०॥ तो कुद समर्थु माक्रमि उग्मीतु वीकट रूपे सो .

( ओव्या ८९५–९०१ )

येची धाविनली चौडेस्वरी वेढीली ते की ॥८९५॥ हानाकारु प्रवर्तला (दे)त्यासी ढीला सवेची तव भाला परमत्रासी (अ) टुकासुराची सोहोदरी वीकाळ भयकरी माहाद्वारी गर्जती ॥ ८९७ ॥ हाक देउनी उठवीली वदळी कली चौइसौरी द्रुस्टी पाहो लागली तव सरीरूप ॥ ८९८ ॥ होउनीया मात राहुनीया नीवातु हाक फोडीली देवाती झाले आनेवान ॥ ६ ॥ ९०० ॥ ६ ॥ बहु नीस्टुर मारि धाविनली कवनीयेपरी जैसा काळ मृ यो हकारी पृथ्वी प्रळयोभाती ॥ ९०१ ॥ तिचे पाठीसि आ

॥ अपूर्ण ॥

## चोंभाऱ्या उपाहरणाची काही त्रुटित पाने

पान ५८

(अ) हुत पाडें मग नीगाली सागळेसी दोहीं वाखोरा दोनी वीडें ॥ ५४ ॥ चडफडीता प्रेतावरी पायें देताये राजकुमरी असुधाचीया

कर्दमामाजी : रूपताये गुढ्घेवरी ॥ ५५ ॥ असुधा भरला रणसागरू : उषा लावन्याचें तारूं : जात असे अनुर्धदीपा : मदनाचें क्रेणें चरूं ॥ ५६ ॥ पाल्ड झळकतु चोपडा : जैसें उभारलें सीड : देपा आवडीचेनी सुवाये : ते चालती असे झडझडां : ॥ ५७ ॥ जवळी पातली त्वरीत : घाये देपीले बहुत : अंतक्रणी उचंबळली : न धरती अस्त्रपात : ॥ ५८ ॥ उपजे पहीला करणारसु : तवं आड भनीनला तामसु : तेव्हळी न करीची रोजना : मनी धरीला बहुतु रोसु ॥ ५९ ॥ पाहा घो वीरश्रीयासरती : विटवीला माझा पती : कैसीं सखे नापें तीपटें : आंगीं रोनीलीं भनंती ॥ ६० ॥ ऐसेयासी काईं करूं : नव्हे आतांचा अवस्त्ररू : सरो झुंगांची वेल : मग पुसों हा त्रीधारू ॥ ६१ ॥ हातीं घोपीली सागळ : पाणीयें वरा गुन्ळा : वारोरांचीया फोडी काढ़नी : मग दीधले तांबोळ ॥ ६२ ॥ तांबोळ घेतीया अवस्वरा : फोडी न लगेची अवधारा : उषा म्हणे हलु घाये : नाहीं पोचलें जीव्हार : ॥ ६३ ॥ भुजा दंडीं घाये कैसे : असुध घोहोळ ते नीमीसें : ऐरी मुद्रा काढीली : रगन नीर्पते नीमीसें : ॥ ६४ ॥ अनुर्धु म्हणे तीये अवस्वरी : तुं जाये मागुती झडकरी : पुटील सैन्य उठावेल : पडसी.... ...

पान ६०

सत्वाची भरोव (री) ॥ ७६ ॥ भद्रजाती मातरा : बुंधी पावेंसीं आलीला : तैसाची बोसीने घे रायेमीं : बोल करीत असें बांधला ॥ ७७ ॥ ऐसा तो नोकें बोलताये : तवं आवेसु धरीला रायें : आतां मारीन रे तुयें : तरी आड कवण ठाये : ॥ ७८ ॥ आतां वधीन रे तुयें : साणी पांडें करीन बहुतें : तुझेनी रगते मासें : पुजीन ग्रामदैवतें : ॥ ७९ ॥ राउळीं रींगालासी चोरु : नेउ आदरीलें लेंकरूं : हातीं पाईं बाधा रे तनः यातें वीचंवीत मारूं : ॥ ८० ॥ मोहोरीया दादा रे यांडूकीं : सुया आदळा रे नयीं : नातरी याचें (तों?) [1]उंपीजे पैरीं : मरैल आपुल्याची दोर्पी ॥ ८१ ॥ नातरी प्रकाळा काइसा : याचें लानीन मीं सीस : म्हणौनी पर्ग काढीलें : घावो उभारीला कैसा : ॥ ८२ ॥ तीपट पर्ग तोळीत : वीजुसामान लपलपीत : गगनी सुरवर आंदोळलें : प्रीथ्वी थरथरां कांपत : ॥ ८३ ॥ अनुर्धावरी घावो पडत : तवं उषा पातली त्वरीत : आपण आड उभी ठेली : घाया घोडनीले हातः ॥ ८४ ॥ दोघांवरी पडतां घावो : तवं आणीकीं धरीला रावो : सोडा सोडा रे न धरा मातें : फेडीन दोघांचा ठावो : ॥ ८५ ॥ कुमरी नव्हे रे पापीणी : आपटुधी परद्वारीणी : कुळा लंछन लावीलें : उदरीं जन्मलीं वैरीणी : ॥ ८६ ॥ ऐसी येपरीची जतन देपा : मज पीतेयाची नाहीं संका : कवणीये ठांईची द्वारावती : वैरीयां मीनली आइका ॥ ८७ ॥ अस्त्रीया गीळीलें दाडस : तें बोलणें सास दीसे : आपुली...

---

१ 'झुंघीं' असा शब्द असावा.

## पान ८२

जळताती धडधडां : ॥ १८ ॥ तेन्हळी बाहीरी नीगो वीहाले : मग भीतरीची यळीकाजीलें : देपा दुर्ग पणासीलें : हुव्या आटाळा वळवले ॥ १९ ॥ जळत सत्क्षेणीके माडें : ते आगीचेनी उजीयेडें : सैन्य दीसे यादवांचें : जैसे कल्पांतीचे कडें ॥ २० ॥ नाना भेटाचा गोवळीं : केली राउळगणाची होळी : होईल पांडेनी धुळवाडी : पाही देहाचा उपेकाळीं ॥ २१ ॥ तेतुलेया अवसरा : तवं पातले सुर्येकरां : वोहोटू वाईला अंधकारें : उदो जाला दीनकरा ॥ २२ ॥ आतां प्रभातें अवस्वरीं : काईकेलें तेणे मुरारी : वीर राहीले त्रीभगीं : भरती रंधीली नगरी : ॥ २३ ॥ रुक्मीणी जांबवंती : सत्यभामा नग्नजीती : हे माद्री मीत्रवीद्या : जे कां काळिंद्री म्हणीपती ॥ २४ ॥ आटईफाट महीपीया अवधारां : येकेकीचे दाहा दाहा कुंमर : ते या नगराचा आठे दीसीं : तेयांचे जाले मेलीकार ॥ २५ ॥ सत्की म्हणे कृष्णदासा : नव्हे नव्हे ग्रंथु ऐसा : तेयां वीरांचीं नावें साधें : जयाचा कृष्णासी भरवसा ॥ २६ ॥

## प्रसग ५

चारदेष्णे सुदचारु : चारदेहो सुचारु : चारुगुप्त भद्रचारु : चारुचंद्रु त्रिचक्र चारु : ॥ २७ ॥ वडील प्रद्मनु अवधारा : ऐसे दाही सोहोदर : राया भीमकाची कन्या : तीये रुक्मीणीचे कुंमर : ॥ २८ ॥ वळी कृरगासमान : जवळीस ...... ..

## पान ९१

ती श्रोतेजण : ॥ १६ ॥ वीस्णु पुराणी श्रीभागवतीं : हरीवंसी तीही ग्रंथीं : पद्मळ मधुर पर जाणती : सभापर्वि माहाभारथीं : ॥ १७ ॥ साहीं पुराणाआतु जाणा : पटीजत असे उपाहरण : पण दुर्गालागी जाली : कव्हणे ठाईं न दीसे खुण ॥ १८ ॥ कथीलें नाहीं व्यासदेवें : म्या कैसेनी अनुवादावें : न पुरे श्रोतेयांची आइणी : म्हणौनी नाथीलें न बोलावें ॥ १९ ॥ आपणाची बैकारू : सुची अस्वेपु परीहरू : तेथे दोषु ठेवावेया : दुर्जनासी नाहीं सचारू : ॥ २० ॥ कंमळवनीचे भपार:

---

१ या ओवीत कृष्णाच्या अष्टनायिकांपैकीं लक्ष्मणा सोडून बाकीच्या ७ नायिका आहेत. माद्री ऐवजी पुराणात 'भद्रा' हे नांव येतें (भागवत १०।५८). मित्रविंदा नाव तेथें मित्रविंदा असें आढळतें.

२ चारुदेष्ण, सुदेष्ण, चारुदेह, सुचारु, चारुगुप्त, भद्रचारु, चारुचंद्र, विचारु, चारु व प्रद्युम्न हे दहा रुक्मिणीपुत्र. (भागवत १०।६१). येथें विचारु ऐवजी त्रिचक्र आहे व एकदोन नांवांत थोडा फरक आहे.

३ उषेची कथा भागवत १०।६२-६३, विष्णुपुराण अंश ५ अ ३२-३३, महाभारत सभापर्व अ. ६०, व हरिवंश २।११६-१२७ यांत आहे.

४ 'का कमलकंदा आणि दर्दुरी। नादणूक तरि येकाची घरीं। परि पराग सेविजे भ्रमरीं। एरीं चिखलचि उरे॥ (ज्ञानेश्वरी, सरकारी प्रत ९।५७)

पराग चरती भ्रमेर : तेयांचे सनैधी असौनी : चीपलु भपीती दर्दुर ॥ २१ ॥ [1]पीर घेउनी जाती श्राण : गोंचीड करीती क्षसुधपाण : श्रोते गुणा संतोपती : [1]दोपु गवसीती दुर्जन : ॥ २२ ॥ पेद्‌पदु लब्धु परीमळामी : गोपींपर्ती वैसे मासी : संत पाहानी भावार्थु : दोषीं द्रुस्टी दुर्जनासी : ॥ २३ ॥ ऐसे दुर्जन अपार : तेही माझे सोहोदर : नींदा करीतां घेउनी जाती : मधें पाप भरधारा ॥ २४ ॥ बहुत अलविस्ती प्रसंगेः तरी मागील्लु रसु भंगे : तरी चाळों आतां पदींपदीं : पुढीला ग्रंथाचेनी मार्गे ॥ २५ ॥ आतां भीतरी पलाणैल : तेणें त्रीभुवण कांपैल : चोंभा म्हणे अनुवादैन : जैसे भवाणी सांघैल : ॥ २६ ॥ छ ॥

प्रसंग ७

ऐतुलें बाहीरी वर्तलें : भीतरी बाणु पहुडले : सुपमाजने सारुनी : सभामंडपी बैसले : ॥ २७ ॥ देपा चरण पक्षाळीलें : ........

पान १०१

या मेळावेयाची थोरी : कवणा वर्णवे ने महीमा ॥ २७ ॥ सर्वे चतुरांगें मपीतें : मोटकीं दहाची प्रयोतें : राहा रे म्हणौनी धरूं सकनी : वरी पडलेया अकासातें ॥ २८ ॥ याही मागां वीरराजु : नीगताये मंडळी कुमंभुजु : सर्वे पनास कोडी सैन्या : जैसा प्रताप सुजुं : ॥ २९ ॥ त्याही मागां मळधरू : बाणाद्ळीं लाठा वीरू : सर्वे सारी लक्षु सैन्या : तेया आगळिये बाणासुरु ॥ ४० ॥ बाणासर्वे केती वीर जाणा : चतुरंगाची वीवंचना : वेगळाली अनुवादैन : श्रोतां दीजो अवधान : ॥ ४१ ॥ तीनी कोडी कुंजरां : नव कोडी रहवरां : येक माहापद्म पायेदळा : तेरा कोडी असीवारां : ॥ ४२ ॥ येतुलेन दळभारेंसी ; बाणु नगराचां प्रदेसी : वोज केली झुंझावेयाची : उभा ठेला रणभुमीसी : ॥ ४३ ॥ बाणासुर सपरीवारी : उभा नगरासी बाहीरी : ऐरीं कैसी सुचा केली : यादवांचां मेलीकारीं : ॥ ४४ ॥ यादवांचा कटकी : झुंझारी माडली नीकी : तैसे गजभार मोगर : अरणी वोज केली नीकी ॥ ४५ ॥ वोज जाली दोही सैन्या : येर्थानु झुंझाची रचना : तवं युधी आळवली आणीकी : मर्म्हेयांचेया नंदना : ॥ ४६ ॥ वीनोदु पडीये मल्लकुमरा : *कळी लावील हरीहरां : चोंभा म्हणे अवधारीजो : पुढील कथा मनोहर : ॥ ९ ॥*

मारंदु आपणप यांचें म्हणत : आम्ही कैसे असोनीयेत :

— शेवटलें *पान —

*हातीं : मग भांग वीकळ पडलें : ॥ ८३ ॥ सा . . . मुं सरली : थाळुमाळु छेदैली :*

---

१ 'नावडि घेउनि चंदनाचा रसीं : आगामाजी खत पाहे मासी : तेवि गुण सांडौनि दोपु गिवसी : क्षुद्र जनु ॥ ( शिशुपालवध २८ )

* हा फार त्रुटित भाग छापील २१—२८ पृष्ठामधल्या तयारखाचा दिसतो.

आर्ता स . . . रेपा नीगौनी गेली : ॥ ८४ ॥ स्वप्न देपों सरले . . . ची गजबजौनी उठीली : घांगुसी ते आंचुरणी तव . . . यावरी असे येकली : ॥ ८५ ॥ म्हणे आहा गा प्राणनाथा : का . . . मार्ते सांडूनी जावाः म्हणौनी पांवुची आळेगीला : दडकरी आदळला माचा: ॥ ८६ ॥ नीडळा नीडळ मेळौ गेली : तवं ल्लहारीं दुखवली : काधनी बंदे (?) भुमीकेवरी : दडकरी आदळली: ॥ ८७ ॥ दुप न मनीत उठीली : धावौनी द्वारीं.उभी टेली : जा तु नेत्रपेची पेडता : मग मागौती भीतरी आली: ॥ ८८ ॥ हाती घेउनीयां वाती : पांवांआड असे पाहाती : तीये अवस्वरीं . . . र पा : 'झड-करी पातली धांवती : ॥ . . . ची आला : पण मजसीं रुसौनी गेला : पाहा ला . ! . असैल भीतरीची ल्पाला ॥ ९० ॥ येरी म्हणे भम . . . समोचा कें गीवसीसि : चाल बैसों काई देपीलें तें सांघ . . . मजपासी : ॥ ९१ ॥ म्हणौनी धरीली ते करीं : बैस-वीली . . . स तुळीकेवरी : येरी मदने व्यापीली : आपणेयांचें न सव . . . ॥ ९२ ॥ भार्वा काइ् चो सांघैन : गेलें गेलें हातीचें नीधान : . . . नीगैल आठवीतां: त्यातें कवणे ठाइ् गीवसीन ॥ ९३ ॥ . . . ला मागौता : प्राणु त्याची सर्वे जाता : कुडी ठा . . . चेंतन : कवण भोगील हे अवस्ता ॥ ९४ ॥ . . . शु भुवागु : व्यापीता कवणु वेगु : पाउलें पाहे पा . . .



# परिशिष्ट १

## कविपरिचय

### १ विठ्ठल कळपूरकर

विठ्ठल कळपूरकरकृत प्रस्तुत त्रुटित काव्याची प्रत धुळे येथील राजवाडे संशोधन मंदिरांत आहे व तिची नक्कल त्या संस्थेच्या कार्यवाहांनी प्राप्त करून दिली या काव्याचे आरंभाचे व शेवटचे काही श्लोक इतिहासाचार्य राजवाडे यांनी इ स १९०९ मध्यें 'सरस्वतीमंदिर' मासिकांत प्रसिद्ध केले त्यांना मिळालेली प्रत ही असून त्यावेळीं ती संपूर्ण होती असें दिसतें. आतां प्रस्तुत प्रतींत शेवटचे महत्त्वाचे श्लोक नाहींत आरंभींचे श्लोक सरस्वतीमंदिरांतील श्लोकांशीं जुळतात दोनशेंदहतिसाव्या श्लोकावरून हे काव्य शके १५३६ (इ स १६१४) मध्यें लिहिलें, व शेवटल्या श्लोकावरून त्यांत २३६ श्लोक होते असें कळतें. हस्तलिखित अशुद्ध असून अनुस्वाराचा अभाव, काना, मात्रा, अक्षरेंहि जागोजागीं लुप्त, ऱ्हस्व दीर्घ हवेतसें लिहिलेलें, शब्द न तोडलेले, प, स, ऐवजीं श, व न ऐवजीं ण इत्यादि गोष्टी या हस्तलिखितांत दिसून येतात सुदैवानें यापैकीं बरेच दोष काव्यरचना श्लोकवृत्तांत असल्यानें दुरुस्त करता आले या दुरुस्त्या अगदीं जरूर तेवढ्याच केल्या आहेत

आपल्याला विठ्ठल बीडकर हा कवि जास्त परिचित. त्याच्यापूर्वी सुमारें पन्नास वर्षे हा दुसरा विठ्ठल होऊन गेला. विठ्ठल कळपूरकराचें कवित्व बीडकरापुढें कमी पडतें विठ्ठल कळपूरकर अनेकदां वृत्ताची ओढाताण करतो कांहीं वेळां शब्दांची कसरत करू पाहतो, पण त्यांत अर्थाची ओढाताण होते. (उदाहरणार्थ श्लोक २६) पण तो अनेकदां 'जो भ्रू विक्षेपमात्रें त्रिभुवन रचितो तो निजे कुंजगेहीं' (श्लोक २००) व '--अथ परिमळतैलें शीघ्र अभ्यांग केला' (श्लोक ९) असे सुरस वा सोपे श्लोक लिहूं शकतो या काव्याचें एक महत्त्व म्हणजे महानुभावीय काव्यरचना सोडल्यास, ज्याचा काळ निश्चित माहीत आहे अशा श्लोकरचनेंत या काव्याचा पहिला क्रमांक लागेल. एकदरीत हे काव्य जिवंत ठेवण्याजोगें वाटतें

या काव्याचें 'रासक्रीडा' हे नांव सरस्वतीमंदिर मासिकांतील (इ स १९०९) राजवाड्यांच्या लेखांत आहे, परंतु उपलब्ध श्लोकावरून हें नांव का पडलें तें बरोबर कळत नाहीं या काव्याची आणखी एखादी प्रत मिळवण्याचा यत्न केला पण तो यशस्वी झाला नाहीं

संदर्भ-(१) विठ्ठलकवि, शके १५३६, सरस्वतीमंदिर ८।८ (इ स १९०९)
नि का राजवाडे

(२) नवें नवनीत, प्रथम आवृत्ति, पृ १६८, १६९ व पृष्ठ ६०१.

(३) विठ्ठल कळपूरकराची रासक्रीडा–लोकसत्ता ता ४-६-१९६१

## २ नामापाठक

पुणें जिल्ह्यांतील केंदूर गांवीं पाठक घराण्यांत नामापाठक होऊन गेले व ते ज्ञानेश्वरकालीन कान्हो पाठकांचे नातू किंवा पणतू असल्याचें पांगारकरांनीं नमूद केलें आहे त्याचें आडनांव राजपाठक नामा पाठकांचें काव्य पुष्कळ आहे पण तें सर्व अप्रकाशित राहिलें. त्याच्या जागोजागीं आढळणाऱ्या हस्तलिखित प्रतींवरून ते एकाकाळीं पुष्कळ लोकप्रिय होतेसें दिसतें त्याचें अश्वमेध हे मुख्य काव्य व इतर पुष्कळ स्फुट काव्यें उपलब्ध आहेत या स्फुट काव्यांपैकीं वस्त्रहरण हें ३१२ ओव्यांचें प्रकरण आहे व त्याचे शेवटीं 'इति श्रीमहाभारते वैशंपायनजन्मेजयसंवादे सभापर्वणि वस्त्रहरणकथा समाप्ति' असें सांगितलेलें आढळतें त्यावरून त्यांनीं महाभारतावर अन्य रचना केली होती असें वाटतें विष्णुदासनाम्याच्या अप्रकाशित महाभारताच्या कांहीं अध्यायांत कर्त्यांचें नांव नामापाठक किंवा पाठक नामा असें लिहिलेलें दिसून येतें व हीच तऱ्हा इतर आख्यानांची या मुद्याचा अधिक अभ्यास झाला पाहिजे काव्यशैली पाहतां नामा पाठक व विष्णुदासनामा हे कवि भिन्न वाटतात नामा पाठक आणि विष्णुदास नामा हीं नांवें केव्हां केव्हां 'पठण करणारा' व विष्णूचा दास याअर्थी वापरलीं जात असावी असा तर्क करावा लागतो

*प्रस्तुत चंद्रहास्यकथा नामापाठकाच्या अश्वमेधांत अंतर्भूत झाली असून तिची स्वतंत्र हस्तलिखितेंहि जागोजागीं आढळतात या अश्वमेधाचीं व चंद्रहास्यकथेचीं रूपांतरें इतकीं आहेत कीं पाठभेदांसह शुद्ध प्रत तयार करणें शक्य नाहीं चंद्रहास्यकथेच्या या निरनिराळ्या प्रतींत ओवीसंख्या व अर्थ साधारणत एकच असतात अशा प्रतीं पैकीं एक प्रत येथें छापली आहे तींत ठिकठिकाणीं अशुद्धता, अनुस्वाराचा अभाव, लुप्त अक्षरें, निरर्थक घातलेलीं जादा अक्षरें इत्यादि अनेक दोष होते परंतु दुसऱ्या एका अश्वमेधपर्वांतर्गत चंद्रहासकथेच्या मदतीनें तें अगदीं जरूर तेथेंच दुरुस्त केले या कथेचें संस्कृत कथानक जैमिनी अश्वमेधाच्या ५० ते ५९ अध्यायात येतें संस्कृत मधील चंद्रहास व धृष्टबुद्धि या नावांचें चंद्रहास्य व दुष्टबुद्धि असें रूपांतर झालें*

*अश्वमेध व चंद्रहास्य कथा आज आपल्यासमोर थोड्याफार आधुनिकीकरण झालेल्या स्वरूपांत आहेत हें अश्वमेधाच्या कांहीं जुन्या त्रुटित पृष्ठावरून कळून येईल या पृष्ठांतला चंद्रहास्यकथेचा उतारा तिसऱ्या प्रकरणांतील ४८ ते ६२ ओव्यां-संबंधीं आहे आधुनिकीकरण कसें होत गेलं त्याचीं कांहीं उदाहरणें पहा '—*

| ओवी | प्रस्तुत हस्तलिखितांत | जुन्या त्रुटित पृष्ठांत |
|---|---|---|
| ४८ | येह प्रताप सांगो किती | ऐंह प्रतापु सांघो केती |
| ५५ | देखोनी सुखिया पै जाला | देषौनि सुषिया झाला |
| ५९ | आम्हावरी कां कोपत असा | को आम्हावरी रागेंजता |

या त्रुटित पृष्ठांच्या मापेवरून अश्वमेध ग्रंथ इसवीसनाच्या चवदाव्या शतका-अखेरचा किंवा पंधराव्या शतकाच्या पूर्वार्धांतला वाटतो. वंशावळीच्या माहितीवरून व नामा पाठकांच्या काव्यांचीं पुष्कळ हस्तलिखितें सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांतलीं आहेत हें लक्षांत घेतां हा काळ सयुक्तिक दिसतो. प्रस्तुत काव्यात प्राचीन शब्द भरपूर सापडतात.

श्रीधरांच्यासमोर हे काव्य होतें असें दिसतें. त्यांच्या अश्वमेधात ५१ ते ६० अध्यायांत ही कथा येते. 'बाळासवें करी क्रीडन। अनाथ जाणोनि देती भोजन। कोणी आंगइटोपी जाण। देती आपले बाळाची॥' (५१।५१) या ओवीचें प्रथम प्रकरणाच्या एकतीस व सदतीस या ओव्यांशीं स्पष्ट साम्य आहे. रामदासस्वामींच्या नंतर रामसुतात्मज विश्वनाथ हा कवि होऊन गेला. त्यानें श्लोकवृत्तांत चंद्रहास्यकथा लिहिली त्याचेसमोर नामा पाठकाचें काव्य होतें. त्याचीं कांहीं उदाहरणें पहा:—

| श्लोक | नामा पाठकाची ओवी. |
| --- | --- |
| हळफळ नवरी हे अंतरीं धीट मोठी (६।२६) | म्हणती हाळफळ नोवरी (२।१३४) |
| क्षणभरि रगडूं मी पादपद्में वराचीं (६।२३) | देऊं पोटकुळ्या रगडू पाये (२।१२८) |
| दिसे लेंकुरामाजि लावण्यराशी। | जैसा चंद्र तारागणांमधीं। |
| विराजे जसा चंद्र तारांगणेंसी (२।७) | तैसा लेंकुरांत मीरवतसे॥ (१।३६) |

या चंद्रहास्यकथेची एक संक्षिप्त आवृत्ति उपलब्ध असून ती या प्रतीच्या सुमारें एकतृतीयांश आहे. तिच्या दोन प्रकरणांत कर्त्याचें नाव विष्णुदास नामा लिहिलेलें आहे. पण हें काव्य नामा पाठकाचेंच आहे असें मानावें लागतें. नामा पाठकाचीं काव्यें गोळा केलीं जात आहेत. तीं लवकरच प्रकाशित होतील अशी आशा करतो.

संदर्भ-(१) मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १ व २. ल. रा. पांगारकर.
(२) तंजावर M. S. ८५३ व ८२५.
(३) नवें नवनीत, पृष्ठ ९२, ९३ व ५९१.

## ३ एक अनामिक कवि

तंजावर येथें सरस्वतीमहाल ग्रंथालयांत संकीर्ण कवितांचीं हस्तलिखितें चाळतांना 'द्रौपदीस्वयंवर' हें त्रुटित काव्य आढळलें. त्यांत १ ते १९५ हीं कडवीं नाहींत. १९६ ते २३८ या कडव्यांतही त्रुटित भाग आहेत. हें काव्य वाचतांना महदंबेच्या धवळ्यांचें स्मरण होतें. धवळ्यांत चार ओळींचें कडवें येतें. दर दोन चरण प्रासयुक्त असतात. या काव्यांतहि प्रास आहेत. बरींच कडवीं चार चरणांचीं आहेत. पोथींत पाडलेले चरण बरोबर आहेत की नाहींत हें सांगतां येत नाहीं.

या काव्यात जुने मराठी शब्द दिसतात सबंध काव्य उपलब्ध झाल्यास त्याबद्दल जास्त अनुमान करतां येईल. तथापि हें काव्य एकनाथपूर्वकालीन वाटते. काव्यांत कसातले शब्द दुसऱ्या कडव्याच्या अनुरोधानें त्रुटित भाग पुरा करण्यासाठीं घातले आहेत

## ४ विश्वनाथ कवि

विश्वनाथ कवीच्या ब्रह्मांड पुराणाचें हस्तलिखित धुळें* येथील सत्कार्योत्तेजक सभेकडे आहे तें त्रुटित असून त्यात एकदर सुमारें साडेचारशें ओव्या उपलब्ध झाल्या पोथी जीर्ण स्थितींत आहे पोथींत ओव्या अनेकदा भलत्याच ठिकाणीं सपविल्या जातात, अनुस्वार नाहींत, न आणि ण, ल च ळ, स आणि श याची भेसळ आढळते. अगदीं उघड चुकांखेरीज मूळ हस्तलिखितांत छापताना फेरफार केलेला नाहीं उदाहरणाच्या पृष्ठाप्रमाणेंच या पोथींत ख ऐवजी प येतो श ऐवजी ज्ञ येतो सरीलाबद्दल सुमरिला, शक्ति ऐवजी सक्ति अशीं रूपें व 'मग झाले आने आन' 'तुथे' असे शब्दप्रयोग आढळतात 'आनुनु' सारखीं रूपें यांत पुष्कळ आहेत या काव्यांत उदाहरणाप्रमाणें बोलींतल्या शब्दाचीं रूपें येतात हें काव्य एकनाथपूर्वकालीन दिसतें कवीचें नांव १४६, ६५५, व ७७१ या ओव्यात येतें या कवीबद्दल काहींच माहिती नाहीं विप्र विश्वनाथ या कवीचें अभिमन्युविवाह हें अप्रकाशित काव्य उपलब्ध आहे तो कवीहि प्राचीन वाटतो, पण दोहोंचा सबध आहे की नाहीं हें दोन्ही काव्यांचा अभ्यास केल्यावरच ठरवतां येईल.

विश्वनाथान काव्यात दिलेली माहिती मूळ ब्रह्मांडपुराणावरून किंवा दुसरीकडून कुठून घेतली तें कळत नाहीं वेंकटेश्वर प्रेसचें ब्रह्मांड महापुराण उपलब्ध आहे परंतु ब्रह्मांड पुराण निराळें होते असें दिसतें नारदपुराणांत ब्रह्मांडपुराणाच वर्णन करताना त्यात 'काश्यपेयानुकथनं ऋषिवंशनिरूपणम्' इत्यादि ( ओव्या १२१–१२२ पाहा ) भाग असल्याचा उल्लेख आढळतो

विश्वनाथाचें काव्य अगदीं नीरस भासतें व त्यामुळें तें नष्टप्राय झालें असणार पण तें भाषेच्या दृष्टीनें महत्त्वाचें वाटतें त्याची दुसरीकडे कुठेंहि प्रत आढळली नाहीं दुसरी प्रत नसल्यामुळें अनेक ठिकाणीं अशुद्ध किंवा चुकीच्या लेखनाचं शुद्धीकरण अशक्य झालें.

संदर्भ—( १ ) Puranas, H. H. Wilson, 1808
( २ ) पुराणनिरीक्षण—च गु काळे
( ३ ) विश्वनाथकृत ब्रह्मांडपुराण—महाराष्ट्र साहित्यपत्रिका १४११३७ एप्रिल जून १९६१

* बाडांक ८६७

## ५ चोंभा कवि

भारत इतिहास संशोधक मंडळाच्या शके १८३३ च्या अहवालांत कै. वि. का. राजवाडे यांनीं चोंभा कवीच्या उपाहरणाचीं त्रुटित पृष्ठें परिश्रमपूर्वक तयार केलेल्या टीपा देऊन प्रसिद्ध केलीं. हीं पृष्ठें कै. शंकरराव देवांना तिसगांव मठात मिळालीं. त्या नंतर केव्हातरी त्याना तेथेंच प्रस्तुत पृष्ठें मिळालीं व त्यामुळें तीं प्रसिद्ध करण्यांत आलीं नाहींत असें दिसतें धुळें येथील समर्थवाग्देवता मंदिराच्या सूचींत बाडाक ८२३ मध्यें हीं पृष्ठें नमूद केलेलीं आढळल्यावर त्याची नक्कल करवून घेतली. राजवाडे यांना मिळालेल्या पृष्ठाचा व या पृष्ठाचा लेखक एकच हें हस्ताक्षरावरून कळून येतें त्यांनीं वर्णन केलेलीं सर्व वैशिष्टें या पृष्ठांतहि दिसतात. उपाहरणांत तत्कालीन भाषेची बोलीतलीं रूपें येतात हा या काव्याचा विशेष आहे. अशा तऱ्हेचीं दुसरीं प्राचीन काव्यें जवळ जवळ नाहींतच. ओव्यांची रचना नेहमींपेक्षा निराळ्या प्रकारची आहे प्रस्तुत पृष्ठांतलें ५८ पान छापील ५७ व्या पृष्ठाशीं बरोबर जुळतें. त्यांतली शेवटची ओवी—

'ऐरी म्हणे ऐसे घडे : तरी मी दैवांची...'

अशी आहे पृष्ठ ९१ व १०१ यांत कवीचें नांव दोनदां येते. ९१ पृष्ठांत कवि स्वतःला 'कृष्णदास' म्हणवितो, व विष्णुपुराण, भागवत महाभारताचें सभापर्व व हरिवंश यातल्या उपाहरणकथेचा उल्लेख करतो

चोंभा हा संत कवि होता असें रमावल्लभदासांच्या संतनामावळीवरून दिसतें देवदास, शेखमहमद इत्यादिकांनींहि त्याचा उल्लेख केला आहे. भाषेच्या दृष्टीनें हा ज्ञानेश्वरकाळाला फार जवळचा वाटतो पृष्ठ ९१।२१ ९१।२२ व ९१।२३ या ओव्यांचें ज्ञानेश्वरी व शिशुपालवधांतल्या ओव्यांशीं असलेलें विशेष साम्य लक्षांत घेण्याजोगें आहे.

संदर्भ—भारतइतिहास संशोधकमंडळ अहवाल शके १८३३
(१) 'नवें नवनीत' पृष्ठ ८०,८१ व ५८९
(२) चोंभा कवीचे उपाहरण-लोकसत्ता ता. १२-३-६१.
(३) महाराष्ट्र साहित्यपत्रिका ३४।१३७, एप्रिल जून १९६१.

---

वृद्धाप्य = वृद्धपण
वोडव = आदर सत्कार
वोडवणें = ओढवणें, पुढें करणें
वोथर = ओथंब, थहर
( तोवर अ-ना पाठ )
वोसावणें = ओस पडणें, उदास होणें.
वोहारें = वधूवरें.
संकडी = सांकड, अडचण.
संजोगणी = तयारी, सामुग्री.
सरक्री = त्वरेनें, सरसरत
सवें = आपण होऊन, तावडतोप
सळ = शल्य
सांकळी = सांखळी
सागोपर्नी = सांगोपांगीं या अर्थी
स्फीत = पवित्र, धाडविलेली
हालफळ = या शब्दाचा नक्की अर्थ समजत नाहीं. विश्वनाथ क्वीनेंही हा शब्द वापरला आहे.
हिंसणें = खेंकाळणें
हुरळ = अविचार, भूल
होडे = रास
क्षोणी = पृथ्वी, एक संख्या

## ब्रह्मांडपुराणांतले शब्दार्थ

आनेआन = निराळें, भलतेंच
आपेते = अनुकूल
आसाक्षात = असंख्यात
आक्षावत = संकट टाळण्यासाठीं वगैरे दीप ओवाळण्याचा विधी
उतीम = उत्तम
उधरागती = उद्धारगती
विरान = उड्डाण, संधान
गुढणें = गुंढाळणें
ढवळार = धवलार, वाडा हवेली इ.
ढळमळ = डळमळ
धडेखणी = धडकणी
नंदी = विवाहविधींतील अंत पटावर कुंकवानें काढलेलें स्वस्तिक
निर्गती = सिद्धी, यश
निरवला = झाला ( निर्वर्तला )
निरुता = खचित
निर्वाण = अनर्थ, शेवट
नेवाळे = नवाळें, रुप्याचा किंवा सोन्याचा कमरपट्टा
नेहट = जवळ
पडखळणें = आदळणें
पापर = लाथ
भडकरी = झटकन्
भोज = आनंद, उल्हास
माव = माया
यादी = याद, स्मरण
रहिवासणें = रमणें, राहाणें
लागी = हेतु, ज्याचा पाठलाग करतो ती वस्तु
विंदान = कौशल्य, कपट
वैद्यपुरुष = वेदपुरुष
सत्राण = जोर
संकचली = संकोचित झाला
सत = शांत
सम्रु = श्रम
सुमरिलें = स्मरलें
सोतकळा = प्रसवकळा ?
हडकलणें = ठोकणें, आदळणें
हडकवणें = हलकें करणें

